


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








**संपादक :** नीलिमा गुंडी
**संपादकीय-सल्लागार :** अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
**संपादन-समिती :** नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनन्द काटीकर
**संपादकीय पत्रव्यवहार :** नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनन्द काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004. चलभाष : 09421610704
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक :
**चित्तरंजन भट** - 095459 50808 **विजय पाध्ये** - 098220 31963.
marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

(१) **वार्षिक वर्गणी** - एक वर्ष / तीन वर्षे / पाच वर्षे

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | **रु० १५०/-** | **रु० ४००/-** | **रु० ७००/-** |
| **संस्था :** | **रु० २००/-** | **रु० ५५०/-** | **रु० ९००/-** |

सुट्या अंकाची किंमत रु० ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क रु० २,०००/- + नोंदणी शुल्क रु० १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वत:चे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वत:कडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत रु० ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरात दर :** पूर्ण पान **रु० २,५००/-**, अर्धेपान **१,५००/-**, पाव पान **८००/-**, शुभेच्छा **रु० ४००/-**, आवरण पृष्ठ तीन **रु० ३,०००/-** जाहिरात मराठीत असल्यास उत्तम. हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी (हिवाळा), एप्रिल (उन्हाळा), जुलै (पावसाळा), ऑक्टोबर (दिवाळी).
**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.**

## अनुक्रमणिका





**'भाषा आणि जीवन'च्या**
**सर्व वाचक, लेखक, वर्गणीदार या सर्वांना**
**दिवाळीच्या शुभेच्छा !**



## श्रद्धांजली

१. संस्कृतचे गाढे विद्वान, व्याकरणतज्ज्ञ आणि व्यासंगी प्राध्यापक कृ० श्री० अर्जुनवाडकर यांचे ३० जुलै २०१३ला निधन झाले. ते मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्य होते. संस्थेच्या विविध उपक्रमांमध्ये त्यांचा सक्रिय सहभाग होता. 'शास्त्रीय मराठी व्याकरण' हा त्यांचा संपादित ग्रंथ मराठीच्या अभ्यासकांना सततच मार्गदर्शन करीत राहील. संस्कृत मराठी व्याकरणाबरोबरच 'योग' हाही त्यांचा अभ्यासविषय होता.

२. ज्येष्ठ इतिहास संशोधक डॉ० ब्रह्मानंद देशपांडे यांचे ६ ऑगस्ट २०१३ला निधन झाले. महानुभाव पंथ, संतवाङ्मय, सातवाहन ते मराठा राजवट हा कालखंड आदी अभ्यासविषयांवर त्यांनी संशोधनात्मक लेखन केले आहे. त्यांनी 'देवगिरीचे यादव', 'शोधमुद्रा', 'शब्दवेध' आदी २५ पुस्तके लिहिली आहेत. त्यांचे दहाहून अधिक भाषांवर प्रभुत्व होते. त्यांची वक्तृत्वशैली प्रभावी होती. ते मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्य होते.

३. डॉ० नरेंद्र दाभोलकर यांची २० ऑगस्ट २०१३ रोजी पुणे येथे बंदुकीच्या गोळ्या घालून निर्घृण हत्या करण्यात आली. डॉ० दाभोलकर हे 'अंधश्रद्धा निर्मूलन समिती'चे संस्थापक व कार्यकर्ते होते. ते 'साधना' साप्ताहिकाचे संपादक होते. 'तिमिरातुनी तेजाकडे', 'अंधश्रद्धा विनाशाय' आदी विवेकवादाची मांडणी करणारी प्रबोधनपर पुस्तके त्यांनी लिहिली आहेत.

४. डॉ० म०वि० गोखले यांचे २८ ऑगस्ट २०१३ला निधन झाले. ते नेस वाडिया महाविद्यालय येथे मराठीचे विभागप्रमुख होते व महाराष्ट्र साहित्य परिषदे(पुणे)चे अनेक वर्षे कार्याध्यक्ष होते. त्यांनी 'मराठीतील आरत्या' या विषयावर प्रबंध-लेखन केले होते.

५. ज्येष्ठ नाटककार, विचारवंत प्रा०गो०पु० देशपांडे यांचे १६ ऑक्टोबर २०१३ रोजी निधन झाले. 'उद्ध्वस्त धर्मशाळा', 'सत्यशोधक', आदी नाटके, 'रहिमतपूरकरांची निबंधमाला' हा लेखसंग्रह, 'इत्यादी इत्यादी' हा कवितासंग्रह आदी त्यांचे लेखन महत्त्वपूर्ण आहे. ते जवाहरलाल नेहरू विद्यापीठात प्राध्यापक होते. ते चिनी भाषेचे जाणकार व आंतरराष्ट्रीय पातळीवर मान्यता असलेले राज्यशास्त्राचे प्राध्यापक होते. ते मराठी अभ्यास परिषदेचे आजीव सदस्य होते.

या सर्वांच्या निधनाबद्दल परिषद शोक व्यक्त करते.



अनुक्रमणिका

संपादकीय

# शब्दांची वारंवारता

प्र० ना० परांजपे

बस किंवा रेल्वेची 'फ्रीक्वन्सी' म्हणजे काय हे आपल्याला कुणी समजावून सांगण्याची गरज नसते. एका तासात/दिवसात/आठवड्यात किती वेळा बस किंवा रेल्वे येते/जाते याची गणना म्हणजे तिची फ्रीक्वन्सी किंवा मराठी शब्द वापरायचा झाला तर तिची वारंवारता. प्रवासाचा बेत आखताना या वारंवारतेची माहिती असणे उपयुक्त ठरते. लवकर पोचायचे असेल तर जास्त वारंवारता असलेली बस किंवा लोकल आपण निवडतो. पण शब्दांची वारंवारता म्हणजे काय, हे आपल्याला समजतेच असे नाही. आणि ते समजले तरी तिचा उपयोग काय; हे आपल्याला समजत नाही. म्हणूनच एखादा अपवाद वगळता मराठी शब्दांच्या वारंवारतेचा अभ्यास झालेला दिसत नाही.

मराठी भाषेत किती शब्द आहेत, याची गणना अद्यापि झालेली नाही. म० रा० दाते व चिं० ग० कर्वे यांनी संपादित केलेल्या आणि १९३२मध्ये प्रकाशित झालेल्या (दुसरी आवृत्ती १९८४) 'महाराष्ट्र शब्दकोशा'च्या आठ खंडांत एकूण १,३०,६७० शब्दांची नोंद आहे. पण १९३२नंतर प्रसिद्ध झालेले ग्रामीण, दलित, मुस्लिम इत्यादी वाङ्मय पाहिले की मराठीतील शब्दांची संख्या त्यापेक्षा कितीतरी पट जास्त असणार. पण त्या लाखो शब्दांतील किती शब्द आपल्याला माहीत असतात? माहीत असलेल्या शब्दांतील किती शब्द आपण प्रत्यक्षात वापरतो? त्यातही बोलताना वापरण्याचे सगळे शब्द आपण लिहिताना किंवा लिहिताना वापरण्याचे सगळे शब्द आपण बोलताना वापरतो का? औपचारिक व अनौपचारिक संदर्भांत वापरावयाच्या शब्दांत आपण फरक करतो. उदाहरणार्थ, सौभाग्यवती/अर्धांगी व बायको. मराठी शब्दांच्या अशा अभ्यासाकडे मराठीच्या विद्यार्थ्यांनी व संशोधकांनी आत्तापर्यंत फारसे लक्ष दिलेले नाही. (मराठीत भाषाविज्ञान पुरेशा गांभीर्याने शिकवले गेले असते तर अशी परिस्थिती उद्भवली नसती.)

शब्दांच्या वारंवारतेच्या अभ्यासाचे अनेक उपयोग आहेत. वेगवेगळ्या पातळ्यांवरील वेगवेगळ्या अभ्यासक्षेत्रांतील वेगवेगळ्या वयोगटांसाठी तयार करावयाच्या शब्दकोशांसाठी त्याचा आधार घेता येतो. इंग्रजीमध्ये 'बेसिक' इंग्लिश, 'स्पेशल' इंग्लिश व 'ऑक्सफर्ड' इंग्लिश अशा शब्दांच्या तीन याद्या आढळतात. वारंवार वापरल्या जाणाऱ्या शब्दांच्या संख्येवरून या याद्या बनवल्या गेल्या आहेत. यांपैकी 'बेसिक' इंग्लिशमध्ये ८५०, 'स्पेशल' इंग्लिशमध्ये १५००, 'ऑक्सफर्ड' इंग्लिशमध्ये ३००० शब्दांचा समावेश आहे. ऑक्सफर्ड इंग्लिशमधील ३००० शब्द व त्यावरून साधित होणारे इतर शब्द माहीत





अनुक्रमणिका

असणाऱ्या व्यक्तीला ९५ टक्के इंग्रजी शब्दांचा उपयोग समजतो, असे अभ्यासक म्हणतात. त्यामुळे हे तीन हजार शब्द व एका शब्दापासून इतर शब्द तयार होण्याच्या प्रक्रिया शिकणे/शिकवणे हे भाषाशिक्षणाचे एक उद्दिष्ट ठरते. मराठीत अशा याद्या आहेत का? त्या असाव्यात असे प्रयत्न भाषाशिक्षण क्षेत्रातील अभ्यासकांनी/संशोधकांनी केले आहेत का?

शब्दांच्या 'पायाभूत' (बेसिक), विशेष (स्पेशल) व विद्यापीठ (ऑक्सफर्ड) अशा तीन स्तरांवरील याद्या तयार करण्यासाठी शब्दांच्या वारंवारतेची गणना करणे आवश्यक आहे. त्या गणनेनुसार सर्वात जास्त वेळा वापरले जाणारे एक हजार शब्द, त्यानंतरचे एक हजार, दोन हजार... इत्यादी शब्द मिळाले की द्विभाषी शब्दकोशात कुठल्याही (इंग्रजी, जर्मन, रशियन... अगदी मराठीही) भाषेतील शब्दांचे मराठी अर्थ देताना कोणते शब्द वापरावेत, हे लक्षात येईल. अन्यभाषकांना मराठी शिकवण्यासाठी पाठ्यपुस्तकांत व शब्दकोशांत कोणत्या शब्दांचा समावेश कोणत्या प्राधान्यक्रमाने करावा; हेही ठरवता येईल.

शब्दांच्या वारंवारतेच्या अभ्यासामुळे एखाद्या लेखकाच्या शैलीबद्दलच्या आपल्या आकलनात भर पडू शकते. प्रत्येक लेखकाची शैली वैशिष्ट्यपूर्ण असते; 'स्टाइल इज द मॅन' हे वचन प्रसिद्धच आहे. एखाद्या साहित्यकृतीचा लेखक कोण (ज्ञानेश्वर एक की दोन? यासारखे प्रश्न!), लेखकाच्या लेखनात कालानुरूप, परिस्थितीनुरूप झालेले बदल कोणते, एखाद्या लेखकाचा, एखाद्या जीवनदृष्टीचा किंवा तत्त्वज्ञानाचा (उदाहरणार्थ, अस्तित्ववाद, साम्यवाद, कलावाद इत्यादी) समकालीन साहित्यावर झालेला परिणाम याबद्दल विधाने करताना शब्दांच्या वारंवारतेचा अभ्यास उपयोगी पडतो. परंतु मराठी शब्दांच्या वारंवारतेचा अभ्यास होताना दिसत नाही. एम०फिल० व पीएच०डी० या पदव्यांसाठी इतके प्रबंध लिहिले जातात; पण त्यापैकी एकाही प्रबंधलेखकाचे लक्ष या अभ्यासाकडे वळलेले दिसत नाही.

वरील विधानाला एक अपवाद आहे; आणि तोही पंचेचाळीस-सेहेचाळीस वर्षांपूर्वीचा. त्या वेळी डेक्कन कॉलेजमध्ये श्रीराम वासुदेव भागवत या नावाचे एक कुलसचिव होते. (नंतर ते नागपूर विद्यापीठात उपकुलसचिव या पदावर गेले.) त्यांनी १९५७मध्ये उपयोजित भाषाविज्ञान या विषयात पीएच०डी० केली; त्या वेळी त्यांनी 'फनीमिक फ्रीक्वन्सीज् इन मराठी' या विषयासंबंधी संशोधन करून प्रबंध सादर केला आणि 'पूना युनिव्हर्सिटी ॲण्ड डेक्कन कॉलेज पब्लिकेशन्स इन लिंग्विस्टिक्स' या मालेत १९६१मध्ये तो प्रकाशित झाला. या प्रबंधविषयाच्या शीर्षकातील उरलेला भाग असा : 'ॲण्ड देअर रिलेशन टु डिव्हाइझिंग अ स्पीडस्क्रिप्ट' म्हणजे मराठीसाठी लघुलेखन-लिपी तयार करण्यासाठी मराठी भाषेतील ध्वनींच्या (= स्वनिमांच्या) वारंवारतेचा हा अभ्यास आहे.





अनुक्रमणिका

पण भाषेतील ध्वनी (स्वनिम) स्वतंत्रपणे वापरात येत नाहीत; ते शब्दांत असतात. भाषेतील (अर्थपूर्ण) शब्द स्वनिमांनी बनलेले असतात. त्यामुळे स्वनिमांच्या वारंवारतेची गणना करताना शब्दांच्या वारंवारतेची गणना करणे अपरिहार्य ठरते.

वारंवारता या संकल्पनेचा संबंध नेहमी एखाद्या पाठ्याशी किंवा अनेक पाठ्यांशी असतो. म्हणजे असे की अमुक एका पुस्तकात किंवा अमुक इतक्या पुस्तकांत अमुक शब्दाची किंवा शब्दांची वारंवारता इतकी आहे असे विधानच शास्त्रीय ठरते. म्हणजे मराठी शब्दांची वारंवारता मोजावयाची झाल्यास मराठीतील सर्व ललित व ललितेतर नियतकालिके, वृत्तपत्रे ह्यांतील शब्दांची मोजणी करून त्यांची वारंवारता अभ्यासावी लागेल; पण असा अभ्यास अशक्य कोटीतील आहे, असे म्हणणे वावगे ठरणार नाही. त्यामुळे 'नमुना पाहणी' या संशोधन-पद्धतीचा त्यासाठी उपयोग करावा लागतो. निवडलेला नमुना 'प्रातिनिधिक' असेल याची खबरदारी मात्र घ्यावी लागेल.

भागवतांनी नमुना म्हणून विविध प्रकारच्या लेखनप्रकारांतून अभ्यासासाठी एक लाख शब्द गोळा केले. लेखनप्रकार आणि त्यांतून गोळा केलेली शब्दसंख्या त्यांनी पुढीलप्रमाणे दिली आहे :

(अ) वृत्तपत्रे व नियतकालिके : ... ६०,००० शब्द
- (१) संपादकीय २०,००० शब्द
- (२) बातम्या ... १०,००० शब्द
- (३) लेख ... १५,००० शब्द
- (४) वाचकांची पत्रे ... १०,००० शब्द
- (५) जाहिराती ... ५,००० शब्द

(आ) कथा, कादंबऱ्या व नाटके : ... ३०,००० शब्द
- (६) पुरुष-लेखक ... १७,५०० शब्द
- (७) स्त्री-लेखक ... १२,५०० शब्द

(इ) पाठ्यपुस्तके व बालवाङ्मय : ... १५,००० शब्द
- (८) पाठ्यपुस्तके ... ८,००० शब्द
- (९) मुलांसाठीची मासिके ... ७,००० शब्द

एकूण शब्दसंख्या = अ + आ + इ = १,०५,०००

(अभ्यासावयाच्या नमुन्यासाठी आपण निवडलेल्या सर्व साहित्याचे तपशील भागवतांनी प्रबंधाच्या पहिल्या प्रकरणात दिले आहेत.)

भागवतांनी आपल्या अभ्यासाची फलिते देताना शब्दांच्या दोन याद्या दिल्या आहेत. पैकी एका यादीत नमुन्यातील दहापेक्षा जास्त वारंवारता असलेले शब्द वर्णक्रमाने दिले आहेत. आणि दुसऱ्या यादीत तेच शब्द वारंवारतेच्या उतरत्या क्रमाने दिलेले आहेत.

नमुन्यातील एक लाख शब्दांच्या निधीमध्ये दहापेक्षा जास्त वेळा वापरण्यात आलेल्या शब्दांची संख्या १,३३२ आहे आणि शंभर वा शंभरपेक्षा जास्त वेळा वापरल्या गेलेल्या शब्दांची संख्या १०२ आहे. सर्वात जास्त वारंवारता (१८०८) असलेला शब्द आहे - ''आहे''! त्याखालोखाल ''व'' (१५१३) व ''नाही'' (१०८३) हे शब्द. शंभरपेक्षा जास्त वारंवारता असलेले बरेच शब्द कार्यकारी (=फंक्शनल) शब्द आहेत. 'मी' (४९५), 'आम्ही' (१०५), आपण (१५३), तू (१२१), तो (५१२), ती (४३१), ते (६०३) ही काही सर्वनामे आणि त्यांची वारंवारता.

छप्पन वर्षांपूर्वीच्या या वारंवारता-गणनेची आज फारशी प्रस्तुतता आहे असे नाही. विशेषत: ही गणना लघुलेखन-लिपी तयार करण्यासाठी आधार म्हणून केली होती हे लक्षात घेतले की तिची उपयुक्तता आजच्या काळात फारच मर्यादित आहे; पण वारंवारता-गणनेचा मराठीतील पहिला आणि आजपर्यंतचा बहुधा एकमेव प्रयत्न म्हणून तिला महत्त्व आहे.

मध्यंतरीच्या काळात संगणकाच्या शोधामुळे आणि त्याने केलेल्या नेत्रदीपक प्रगतीमुळे वारंवारता-गणनेचे काम खूपच सोपे झाले आहे. निवडलेली वृत्तपत्रे, नियतकालिके, पुस्तके इ० आंतरजालावर उपलब्ध असण्याची शक्यता आहे. नसतील ती छाननी (स्कॅन) करून संगणकात भरता येतील. शब्दांची गणना, वारंवारतेची गणना इ० कामे संगणकच करील. तसे झाल्यास मराठीच्याच काय पण मराठी माध्यमाच्या सर्वच विषयांच्या पाठ्यपुस्तकांत, शब्दकोशांत कोणते शब्द वापरावेत याचा उलगडा होईल; त्यांचा प्राधान्यक्रम ठरवता येईल. सहचर-शब्दांचा (कॉलोकेशन्स्) शोध घेता येईल आणि अभ्यासक्रमात त्यांचाही समावेश करता येईल आणि कदाचित प्रमाण मराठी आणि बोली मराठी यांच्या वापराबद्दलचा वाद संपुष्टात येईल. ■

## स्वागत

१. 'दिलीप पुरुषोत्तम चित्रे यांची कविता', रणधीर शिंदे, दर्या प्रकाशन, पुणे, २०१३, पृष्ठे २२९, मूल्य रु० २५०/-
२. 'सालोसाल' (कवितासंग्रह) केशव खटींग, प्रतिमा पब्लिकेशन्स, पुणे, २०१३, पृष्ठे ८०, स्वागतमूल्य रु० १००/-
३. 'कोरकू बोली' : डॉ० काशीनाथ विनायक बऱ्हाटे, देवयानी प्रकाशन, मुंबई, २०१२, पृष्ठे ३४०, मूल्य रु० २००/-
४. 'आपले जग' वसंत आपटे, इंद्रायणी साहित्य, पुणे, २०१२, पृष्ठे २२४, मूल्य रु० २००/-
५. 'मराठी भाषेची अ-श्वेतपत्रिका' डॉ० दीपक पवार, मराठी अभ्यास केंद्र, ठाणे, २०१३, पृष्ठे २५८, मूल्य रु० ३००/-

# समाज, भाषा आणि तंत्रज्ञान

## डॉ॰ प्रमोद तलगेरी यांची मुलाखत

**मुलाखतकार : नीलिमा गुंडी**



डॉ॰ प्रमोद तलगेरी

*'इंडिया इंटरनॅशनल मल्टिव्हर्सिटी'चे कुलगुरू. त्यापूर्वी जवाहरलाल नेहरू विद्यापीठात जर्मन भाषेचे प्राध्यापक व अधिष्ठाता. तसेच १९९७ ते २००२मध्ये 'सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ फॉरिन लँग्वेजेस' (हैदराबाद) या विद्यापीठाचे कुलगुरू. हेगेलच्या तत्त्वज्ञानावर म्युनिक विद्यापीठातून पीएच॰डी॰ प्राप्त. 'इंडो-जर्मन कन्सल्टीव्ह ग्रुप'चे सन्माननीय सदस्य. तत्त्वज्ञान. भाषा, शिक्षण आणि संस्कृती या विषयांवर अभ्यासपूर्ण लेखन. युरोप आणि अमेरिकेतील विविध विद्यापीठांमध्ये 'व्हीजिटिंग प्रोफेसर' म्हणून कार्यरत. अनेक शैक्षणिक उपक्रम व सांस्कृतिक कार्यक्रम यामध्ये बहुमोल सहभाग.*

**पाश्चिमात्य देशांत संगणकयुगामुळे भाषाविकासाला अधिक चालना मिळाली आहे, असे चित्र दिसते का?**

पाश्चिमात्य देशांमधील भाषा संगणकयुगाच्या कितीतरी आधी विकसित होत राहिल्या. भाषेचा उपयोग जेव्हा 'हाय व्हॅल्यू कम्युनिकेशन'साठी होतो, तेव्हा भाषाविकासाला अधिक चालना मिळते. नुसतेच ललित साहित्य किंवा घरगुती संभाषण नव्हे; तर विज्ञान, तंत्रज्ञान, सामाजिक शास्त्रे, तत्त्वज्ञान असे मूलभूत वैचारिक साहित्य युरोपमध्ये सतराव्या शतकापासून त्या त्या भाषेत लिहिले गेले. त्याचे मुख्य कारण म्हणजे युरोपीय मध्ययुगाचा (पंधरावे शतक) अस्त होऊन एक बुद्धिप्रामाण्यवाद युरोपमध्ये पसरला. त्याला पोषक अशी पार्श्वभूमी मार्टिन लूथर याने निर्माण केली. १५३३ साली त्याने बायबलचे साध्या आणि सोप्या जर्मन भाषेत भाषांतर केले. हे भाषांतर पद्य रूपात नसून गद्यरूपात होते. गद्य लेखनामुळे दोन गोष्टी शक्य झाल्या. पहिली गोष्ट ; यामुळे भाषा समाजाभिमुख झाली. समाजातील सर्व थरांतील भाषकांच्या व्यवहारांतील शब्दरचना त्यात समाविष्ट झाल्या. सामान्य लोकही ते भाषांतर समजू शकले. बायबलच्या या अभिनव भाषांतरामुळे जर्मन भाषा समाजाच्या सर्व थरांमध्ये पसरली. इतकेच नव्हे, तर तिचा शब्दसंग्रह प्रत्यक्ष जर्मॅनिक, लॅटिन, ग्रीक भाषेतून तसेच वेगवेगळ्या क्षेत्रीय

बोलीभाषेतून घेतला गेला. दुसरी गोष्ट : भाषा केवळ धार्मिक उपचारांसाठी नव्हे; तर एका निधर्मी वैचारिक अभ्यासासाठी आणि चर्चेसाठी वापरात येऊ लागली. त्यानुसार भाषेमध्ये नवीन वैज्ञानिक संकल्पनांची शब्दनिर्मिती होऊ लागली. भाषाविकासाचे व भाषावृद्धीचे हे एक अत्यंत महत्त्वाचे कारण आहे. यातूनच युरोपीय वैज्ञानिक परंपरेचा पाया घातला गेला. या प्रक्रियेमधून सतराव्या शतकात धर्मशास्त्र आणि तत्त्वज्ञानाची क्षेत्रे एकमेकांपासून अलग झाली. या दुभागण्यामुळे भाषेचा उपयोग बदलला. ह्या गद्य भाषेत, धार्मिक शब्द वगळून वैज्ञानिक संकल्पनांसाठी नवीन शब्द तयार झाले. यामुळे भाषा तर्कशुद्ध आणि विवेक बुद्धीवर आधारलेली, त्यामुळे वैज्ञानिक संशोधनासाठी योग्य झाली. त्याप्रमाणे भाषाशैली 'कॉम्प्लेक्स' होत गेली. वैज्ञानिक पारिभाषिक संज्ञांचा प्रचंड संग्रह वाढतच गेला. त्यामुळे निसर्गातील घटनांचे योग्य वर्णन करून निसर्गाचे, बाह्य सृष्टीचे ज्ञान मिळवण्याचे साधन मिळाले.

भाषेच्या या विस्तारामुळे कोशकार्याचे प्रचंड काम सुरू झाले. शब्दार्थकोशाची निर्मिती झाली. तसेच विश्वकोश, पारिभाषिक संज्ञा कोश, संकल्पना कोश, उच्चारण कोश, व्युत्पत्तिकोश, शुद्धलेखन कोश, अशा मूलभूत सुविधांची निर्मिती होत गेली. कोशकार्याची निर्मिती ही अत्यंत महत्त्वाची, भाषासंवर्धनाची ऐतिहासिक घटना आहे. यामुळे समाजामध्ये होत असलेल्या विचारमंथनाचं दृश्य, शास्त्रीय संशोधनातून निर्माण झालेलं ज्ञान ग्रंथरूपातून त्या त्या भाषेत प्रतिबिंबित होत राहिले. सर्वात महत्त्वाचे म्हणजे ज्ञानाच्या सर्व शाखांमध्ये त्या त्या भाषेत अत्यंत उच्च स्तरावर आणि प्रमाणीकृत शब्दसंग्रहाच्या आधारे लिखाण झाले. सारे संशोधन, शोधनिबंध, पीएच०डी०चे थीसिस प्रत्येक देशाच्या आपापल्या राष्ट्रभाषेत लिहिले गेले. त्यामुळे ज्ञानवृद्धीमुळे भाषावृद्धीही होत गेली आणि भाषावृद्धीमुळे ज्ञानवृद्धी. अशा ह्या ऐतिहासिक विकासप्रक्रियेतून उन्नत झालेल्या ज्ञानभाषा आजच संगणक युगात पूरक अशी कामगिरी बजावीत आहेत. आजचे संगणकयुग एक नवीन तंत्रज्ञान संस्कृती घडवीत आहे. यातून नवीन सांस्कृतिक व सामाजिक संदर्भ निर्माण होत आहेत. त्याला पोषक असा भाषाविकासही घडत आहे. त्याचबरोबर नवीन शब्दसंग्रह तयार होत आहे. परंतु त्यामुळे भाषेत आमूलाग्र बदल होतील का, हे सांगणे कठीण आहे.

**जागतिकीकरणाचा भारतीय भाषांवर काय परिणाम होत आहे?**

भारतीयच नव्हेत, तर जगातल्या बहुतेक सर्व भाषा जागतिकीकरणाच्या दबावाखाली आल्या आहेत. जागतिकीकरणाच्या प्रक्रियेमध्ये सर्व जगात इंग्रजीचा मात्र आक्रमक प्रसार होत आहे. फक्त काही मोजक्याच भाषा आंतरराष्ट्रीय व्यापारात वापरल्या जात आहेत. स्पॅनिश, चिनी, जपानी व अरबी. बाकी सर्व भाषा (जर्मनसारख्या बलाढ्य भाषादेखील!) बाजूला पडत चालल्या आहेत. त्यातल्या त्यात एकभाषी देशांमध्ये त्यांच्या मातृभाषा

म्हणजेच त्यांच्या राष्ट्रभाषा प्रामुख्याने सर्व महत्त्वाच्या व्यवहारात वापरल्या जातात. परंतु इंग्रजीच्या आक्रमणामुळे बऱ्याच व्यावसायिक क्षेत्रात संगणकशास्त्र, उच्च वैज्ञानिक संशोधन, आंतरराष्ट्रीय व्यापार यामध्ये इंग्रजीचा वापर वाढत चालला आहे. सांप्रत अमेरिकन इंग्लिशचं जवळजवळ जगभर एक सांस्कृतिक वर्चस्व प्रस्थापित झालं आहे. त्यामुळे अनेक अमेरिकन शब्द आणि वाक्प्रयोग भारतीय भाषांमध्ये थेट प्रवेश करीत आहेत.

या परिप्रेक्ष्यातून पाहिले असता, भारतीय भाषांची सध्याची अवस्था खरोखरच निराशाजनक आहे. सर्व महत्त्वाचे व्यवहार फक्त इंग्रजीतूनच केले जातात. त्यामुळे सर्व भारतीय भाषा मागे पडत चालल्या आहेत. बोलीभाषांची तर गोष्टच सोडा. भारतातील मुख्य भाषासुद्धा नष्ट जरी झाल्या नसल्या, तरी कमकुवत होण्यापासून स्वत:लाच वाचविण्यासाठी धडपडत आहेत. एखादी भाषा टिकण्यासाठी आणि तिची भरभराट होण्यासाठी तीन गोष्टींची आवश्यकता असते : (१) दीर्घकाळ टिकणारं सांस्कृतिक स्थैर्य. (२) राजकीय पाठबळ आणि (३) तिसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे इतर भाषांच्या आक्रमणापासून संरक्षण, की जेणेकरून मूळ भाषेचे संवर्धन नैसर्गिकरीत्या होईल. जगातील सर्व भाषांचा इतिहास पाहता, केवळ बंदिस्त (आयसोलेटेड) राहिलेल्या समाजाच्या भाषांचाच मूलत: नैसर्गिकपणे विकास झाला आहे, हे लक्षात येते.

### युरोपमधील भाषांची उन्नती कशी झाली?

युरोपमधील सर्व राष्ट्रे त्यांच्या त्यांच्या एकभाषिक समाजामधल्या वातावरणातून उदयाला आली. अशाच एकभाषिक वातावरणात भाषेची नैसर्गिकरीत्या भरभराट होते, कारण समाजातील सर्व व्यवहार फक्त त्याच एका भाषेतूनच केले जातात. ती भाषा त्या समाजातील सर्वांची मातृभाषा बनते, इतकेच नव्हे; तर तीच मातृभाषा त्या प्रदेशाची राष्ट्रभाषा बनते आणि त्यातून त्या प्रदेशाला राष्ट्रराज्याचा दर्जा प्राप्त होतो. युरोपमधील सर्व राष्ट्रे अशी एकभाषिकत्वातून जन्माला आली. समाज आणि राष्ट्र एकसंध होऊन राष्ट्र-राज्ये बनली आणि त्यातून राष्ट्रीय ऐक्य निर्माण झाले. या सर्व प्रक्रियेतून एक सक्षम भाषा विकसित होत गेली. जगातील सर्व विकसित भाषांचा हाच इतिहास आहे. त्या सर्व भाषा अशा बंदिस्त, संरक्षित, एकभाषीय वातावरणातच वृद्धिंगत झाल्या आहेत. भारतामध्ये पाश्चिमात्य देशांप्रमाणे असा एकभाषीय इतिहास घडला नाही. त्यामुळे पाश्चिमात्य संकल्पनेप्रमाणे भारतात राष्ट्र-राज्य (नेशन-स्टेट) ही संकल्पना रुजू शकली नाही.

डॉ० गणेश देवी यांनी सर्वेक्षणात नोंदविलेल्या लोकभाषा या समाजाच्या मुख्य प्रवाहापासून दूर राहिलेल्या दुर्गम भागातील आहेत. त्यामुळेच अजूनही त्यांचे अस्तित्व काही प्रमाणात टिकून आहे. त्यांचा इतर जगाशी संपर्क आला की त्यांचीही अस्तित्वाची

लढाई सुरू होण्यास वेळ लागणार नाही. एकवेळ बोलीभाषा जाऊ द्या; पण प्रमुख भारतीय भाषांनाही सध्या ही लढाई लढावी लागत आहे.

युरोपमधील एकभाषिक समाजात असलेल्या बोलीभाषांच्या माध्यमातून व त्यांच्या पार्श्वभूमीवर तिथल्या प्रमुख भाषा (जर्मन, फ्रेंच इत्यादी) नैसर्गिकरीत्या निर्माण झाल्या. त्या भागातील बोलीभाषांची विविध स्थानिक वैशिष्ट्ये व संदर्भ एकजीव होऊनच त्या सर्व आधारभूत प्रमाणिक भाषा होत गेल्या. त्यांना राजकीय पाठबळ मिळाल्यानंतर त्यांना राज्यभाषा म्हणजेच राष्ट्रीय भाषेचा अधिकृत दर्जा मिळाला. सर्व युरोपीय भाषा अशा तऱ्हेने संवर्धित झाल्या. आजचे युरोपीय युनियन हे जरी बहुभाषिक राज्य बनले असले तरी त्यातील प्रत्येक समाज, जर्मनी, फ्रान्स, इटली, स्पेन वगैरे, अजूनही एकभाषिकच राहिला आहे आणि त्यामुळे तो समाज एका राष्ट्रराज्याप्रमाणे आपले भाषिक व्यवहार त्याच एका राष्ट्रीय भाषेत करतो. म्हणून अर्थातच त्यांच्या त्यांच्या भाषांना अजूनही योग्य ते संरक्षण मिळते. आता मात्र इंग्रजीच्या ग्लोबल आक्रमणामुळे त्या भाषांमध्ये देखील अस्थिरतेची भावना तयार होत आहे.

**तंत्रज्ञानंयुगात समाजात भाषेचे स्थान मध्यवर्ती राहील, असे आपणास वाटते का?**

भाषा ही एक सामाजिक प्रक्रिया आहे, भाषेशिवाय समाज होऊच शकत नाही, तो बांधला जात नाही. भाषेच्या माध्यमातूनच समाजामध्ये वेगवेगळ्या विचारधारा व्यक्त होतात, त्यामुळे कुठल्याही युगात का असेना भाषेचं स्थान प्रत्येक समाजात अढळच राहणार आहे. कारण आतापर्यंत 'अबोल' समाज कधी झाला नाही. परंतु भाषेचा उपयोग, तिच्या अभिव्यक्तीचे स्वरूप कालानुसार आणि समाजव्यवस्थेप्रमाणे बदलत असते. तसेच भारतासारख्या बहुभाषिक समाजात वेगवेगळ्या भाषा एकमेकांवर प्रभाव पाडत असतात. त्यामुळे मुख्य स्थानिक भाषेमध्ये एक प्रकारची शिथिलता येते. भाषा शिथिल झाली की भाषेची वैशिष्ट्ये हळूहळू बदलू लागतात. असे वेगवेगळ्या प्रकारचे आघात होतात. उदा० मराठीवर हिंदी व इंग्रजीतून वेगवेगळ्या प्रकारचे म्हणजे शाब्दिक, सांस्कृतिक आघात होत आहेत. त्यामुळे भाषेमधील खास वैशिष्ट्ये बदलू लागतात. योग्य, अधिकृत यंत्रणा भाषेच्या संवर्धनासाठी उपलब्ध नसेल तर हळूहळू भाषेची वैशिष्ट्ये लोप पावतील. उदाहरणार्थ, पन्नास वर्षांपूर्वीपर्यंत मराठीत 'सिंह' शब्द (=सिंव्ह) असा उच्चारला जात असे. परंतु आज हा शब्द 'सींह' असा उच्चारला जात आहे. 'पुन्हा' हा शब्द 'पुन्हा' असा उच्चारला जात आहे. वाक्यरचनेतही बदल घडत आहेत. 'मी म्हणालो' हे वाक्य आता 'मी म्हण्लं' 'तो म्हण्ला' असे ऐकू येते.

इंग्रजीच्या प्रभावामुळे अनेक प्रस्थापित उच्चार वेगळ्या पद्धतीने उच्चारले जात आहेत. उदा० हिंजवडीचा उच्चार आता 'हिंजेवाडी', पुणेचा उच्चार 'पूने' असा, तर मनदर्पण

हा मराठी शब्द रेडिओवर आता हिंदी उच्चाराप्रमाणे 'मन्दर्पण' असा उच्चारला जात आहे. त्यामुळे मराठी उच्चारांची जी वैशिष्ट्ये आहेत, ती हळूहळू शिथिल होत जातील.

आपण नुकत्याच सुरू झालेल्या संगणकयुगाचे जर या पार्श्वभूमीवर अवलोकन केले तर असे दिसून येईल की संगणकशास्त्र नवीन संकल्पना आणि त्यासाठी नवीन शब्दनिर्मिती घडवीत आहे. त्यामुळे भाषाविकासाला एक नवीन दिशा मिळत आहे. मात्र भाषेचा उपयोग आणि तिच्या अभिव्यक्तीचे स्वरूप, त्या त्या सांस्कृतिक, राजकीय, आर्थिक संदर्भात अवलंबून राहील. तसेच भारतासारख्या बहुभाषिक समाजात वेगवेगळ्या भाषा एकमेकांवर प्रभाव पाडत असतात. त्यामुळे स्थानिक भाषेमध्ये शिथिलता येऊ लागते. भाषा शिथिल झाली की त्यात एक पोकळी निर्माण होते. मग परभाषेचे उच्चार, काहीवेळी तर अख्खे शब्दच ती पोकळी भरून काढतात. कालांतराने ते सर्व परकीय शब्द स्थानिक भाषेत चपखल बसतात. त्यातून एक भाषावैविध्य निर्माण होत राहील; पण या वैविध्यामुळे प्रत्यक्ष भारतीय भाषांच्या आधुनिक व्यावसायिक वापरामध्ये कमतरता येत आहे. त्याचबरोबर शेवटी जाता जाता हेही नमूद करणे आवश्यक झाले आहे की एकंदरीत संगणकाच्या जबरदस्त प्रभावामुळे नवीन पिढीचे आपल्या मातृभाषेकडे अक्षम्य दुर्लक्ष होत आहे. भाषांकडे बघण्याचा दृष्टिकोनही बदलत चालला आहे. विशेषेकरून भारतीय भाषांना कमी लेखले जात असून त्यांना विदेशी भाषांच्या तुलनेत गौण मानले जात आहे. त्यामुळे इंग्रजीचे माहात्म्य वाढले आहे. त्यामुळे तंत्रज्ञान युगातसुद्धा भाषेचं स्थान मध्यवर्ती राहीलच.

### मराठी समाजमन आजवर तंत्रज्ञानाला कशाप्रकारे प्रतिसाद देत आले आहे?

या प्रश्नाचे उत्तर देण्याआधी अगोदर पाश्चात्त्य आधुनिकतेच्या इतिहासाचा थोडक्यात आढावा घेऊया. या आधुनिकतेचा युरोपीय भाषासंस्कृतीशी अन्योन्य संबंध आहे. विज्ञान आणि तंत्रज्ञान हे पाश्चात्त्य आधुनिकतेचे एक प्रमुख अंग आहे. तंत्रज्ञान ही संकल्पना म्हणजे केवळ यांत्रिक प्रक्रियांचे ज्ञान नव्हे; तर ती एक प्रगल्भ विचारप्रणाली आहे. विचारांमध्ये एकसूत्रता आणणारी आणि बुद्धिप्रामाण्यावर आधारलेली आहे. त्यानुसार त्यांच्या भाषा, त्यांची रूपके/ 'मेटॅफर' गेल्या तीन शतकांपासून निरंतर वृद्धिंगत आणि त्यामुळे समृद्ध होत आहेत. या सर्व भाषा नैसर्गिकरीत्या वाढत राहून त्यांनी आधुनिकतेमध्ये विनासायास प्रवेश केला. त्यामुळे त्यांचा वैज्ञानिक शब्दसंग्रह त्यांच्याच भाषिक आणि सामाजिक परंपरेतून उत्पन्न झाला आहे. त्यामुळे त्यांचे शोधनिबंध त्यांच्या मातृभाषेतच लिहिले जातात. सर्व युरोपीय देश आपापल्या भाषेत उच्च शिक्षण, संशोधन, विज्ञान-तंत्रज्ञान आंतरराष्ट्रीय व्यापार वगैरे उच्च प्रतीचे व्यवहार पार पाडीत आहेत.

याउलट मराठी समाजमन अजूनही मध्ययुगीन शब्दावलीत अडकलेलं आहे. त्यामुळे





अनुक्रमणिका

मराठीमध्ये किंबहुना कुठल्याही भारतीय भाषेत विज्ञानातल्या पारिभाषिक संज्ञा आपल्या भारतीय वैचारिक परंपरेतून विकसित झाल्या नाहीत.

त्या आपण इंग्रजीतून भाषांतरित स्वरूपात मराठीमध्ये कृत्रिमरीत्या तयार करतो आणि मराठी माध्यमाच्या शाळांमधून फार तर बारावीपर्यंत राबवतो. विद्यार्थी मराठी माध्यमातून उच्च माध्यमिक शिक्षण घेऊन कॉलेजमध्ये आला, तर त्याच्यासमोर इंग्रजी माध्यमाची भिंत पुढे जाण्यासाठी त्याला अडवून ठेवते.

पाश्चात्त्य विज्ञानाची शब्दावली, संकल्पना आणि त्याचे उपयोजन आणि तंत्रज्ञान हे भारतीय ज्ञानपरंपरेत नसल्यामुळे त्यांच्या वैज्ञानिक संकल्पना भारतीय पारंपरिक शब्दसंग्रहाच्या बाहेर राहिल्या. त्यामुळे शाळकरी पातळीवर तुटपुंजे विज्ञान मुलांना दिले गेले. व अजूनही दिले जात आहे. महाविद्यालयीन पातळीवर मात्र हे अचानक बदलते. मराठीत केलेला सर्व खटाटोप व्यर्थ जातो आणि सर्व अभ्यासक्रम इंग्रजीत पार पडतो.

अशामुळे मराठी समाजमनाने तंत्रज्ञानाला दुभंगलेला प्रतिसाद दिला आहे. त्यात शहरी व ग्रामीण असे दोन स्पष्ट भाग पडले आहेत. शास्त्रज्ञ, शिक्षणतज्ज्ञ, शासन व राज्यकर्ते या सर्वांपुढे हा एक पेच पडला आहे. युरोपीय वैज्ञानिक परिभाषा आज ज्या पातळीवर पोचली आहे, त्या पातळीवर मराठी समाजमन काही दशके-शतके पोचू शकणार नाही. ही जाणीव मनात ठेवून मराठी विद्यार्थी विज्ञान व तंत्रज्ञान याचे शिक्षण अर्धवट इंग्रजीत घेतो. ही अत्यंत दयनीय अवस्था आहे. कारण विज्ञानासाठी मराठी भाषा अजूनतरी सुसज्ज नाही. आणि मराठी माध्यमातून आलेला चांगला विद्यार्थी इंग्रजीमधून हे सर्व शिकायला असमर्थ असतो.

या संदर्भामध्ये आणखी एका प्रश्नाचे उत्तर देणे संयुक्तिक ठरेल. तो म्हणजे : अशी भाषांची अवस्था, जी आज आपण भारतीय भाषांमध्ये अनुभवत आहोत, युरोपमध्ये का नाही झाली? याची उत्तरे आपल्याला युरोपच्या सतराव्या शतकाच्या इतिहासात सापडतील.

सतराव्या शतकात युरोपच्या बौद्धिक जीवनात जसा बदल झाला, तसा भारतात कधी झालाच नाही. तोपर्यंत युरोपमध्येसुद्धा जीवनाच्या सर्वच क्षेत्रांत धर्माचे अधिराज्य होते - जसे भारतातही होते. परंतु सतराव्या शतकात युरोपमध्ये तत्त्वज्ञान ही शाखा धार्मिक क्षेत्रापासून फारकत घेऊन वेगळी झाली. (हे मात्र आपल्याकडे घडले नाही.) पुढे अठराव्या शतकात तत्त्वज्ञानाचे क्षेत्र दुभागले आणि विज्ञानाचे नवीन क्षेत्र युरोपात स्थापित झाले. आणि नंतर एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकात विज्ञानांतर्गत विविध शाखांनी आपापली विशेषज्ञतेची क्षेत्रे निर्माण केली आणि आज पुन्हा ज्ञानाचे 'माहिती'मध्ये विभाजन होत आहे. धर्म, तत्त्वज्ञान आणि विज्ञान यांच्यातील मूलभूत भिन्नतेला आणि स्वायत्ततेला मान्यता मिळताच बाह्यसृष्टीच्या आणि वास्तवाच्या

आकलनातच एकदम फरक पडला. त्यामुळे भाषेच्या वापरातही. भाषेचा वापरही निसर्गाच्या वस्तुनिष्ठ वास्तववादी वर्णनासाठी प्रकर्षाने होऊ लागला. त्याचबरोबर आता वास्तवाचे नियंत्रण कुणा देवादिकांच्या हाती नव्हते. आपल्याकडच्या पारंपरिक 'मिथिक' आकलनापेक्षा हे वेगळे होते. (उदाहरणार्थ : मोसमी पावसाचे ढग वरुण देवतेच्या ताब्यात, तेव्हा त्याच्या शांतितुष्टीसाठी यज्ञ करावे इत्यादी छापाचे निसर्गाचे मिथकात्मक पौराणिक आकलन.) वास्तवावर पूर्णत: निसर्गनियमाचे नियंत्रण. आणि हे नियम मानवी बुद्धीला आकलनीय आणि त्यांचा कुठल्याही ईश्वरी मदतीविना भाषेतून शोध घेणे सर्वस्वी शक्य. हे आकलन प्रस्थापित होताच विचारांच्या प्रांतातून धर्माची हकालपट्टी झाली, बुद्धिप्रामाण्य आले. ब्रिटिश तत्त्वज्ञ थॉमस हॉब्ज याने 'धर्म ही पारलौकिक बाब असून तिचा तत्त्वज्ञान किंवा विज्ञान यांच्याशी संबंध नाही' असे स्पष्टपणे म्हटले. तत्त्वज्ञान आणि विज्ञान सर्वस्वी इहलोकाशी संबंधित असून त्यात देवांना प्रवेश बंद होतो. भारतीय इतिहासाच्या कोणत्याही टप्प्यावर धर्म-तत्त्वज्ञान-विज्ञान यांचे असे सांकल्पिक विभाजन झालेच नाही.

सतराव्या शतकात युरोपमध्ये धर्म आणि तत्त्वज्ञान स्वतंत्र झाल्यानंतर त्यातून एक वेगळा सामाजिक विकासाचा विचार सुरू झाला आणि त्यातून भाषेचा एक नवा, धर्मनिरपेक्ष वापर सुरू झाला. धार्मिक परिभाषेपासून मुक्त असलेली ही भाषा तत्त्वज्ञ आणि वैज्ञानिक सर्रास वापरू लागले. 'सेक्युलर' हा शब्द धार्मिक परंपरांशी नाते पूर्णपणे तोडणाऱ्या बुद्धिनिष्ठ विचाराच्या पद्धतीसाठीच वापरायला प्रारंभ झाला. दुसरी गोष्ट म्हणजे, या भाषेला बुद्धीच्या श्रेष्ठतेमुळे आपोआप वरचा दर्जा एकाएकी प्राप्त झाला. एकोणिसाव्या शतकातील भारतामधल्या शैक्षणिक धोरणाचे सर्वेसर्वा लॉर्ड मेकॉले यांनीच इंग्रजीसाठी 'ज्ञानभाषा' हा शब्द वापरात आणला. या नव्या भाषेत बाह्य जगाचे, निसर्गाचे वर्णन करणारी परिभाषा मोठ्या प्रमाणावर वापरली जाऊ लागली. या घडामोडीमुळे युरोपीय भाषांना ज्ञानभाषेची ताकद आली. उच्च कोटीतील ज्ञानासाठी जणू काही निसर्गत:च याच भाषा योग्य आहेत, असेही त्यामुळे वाटू लागले. इंग्रजीबरोबरच जर्मन, फ्रेंच याही भाषा आल्या. यातूनच एक पाश्चात्त्य सांस्कृतिक अधिसत्तेची (हेजेमनी) जाणीव होत गेली या पाश्चिमात्य भाषांनी ज्ञानाच्या वैश्विक सार्वत्रिकतेचे सतत संधारण केले. यांच्या तुलनेत भारतीय देशी भाषा कमी दर्जाच्या होत्या आणि अजूनही आहेत. आजही भारतीय भाषांना धार्मिकतेचा वास असतोच. त्यांची धार्मिकतेतील पाळेमुळे आजही सुटलेली नाहीत. म्हणून युरोपातील या मूल्यनिर्मितीच्या आणि त्यामुळे युरोपीय समाजाला जो नवा आकार मिळाला, त्या सर्व संदर्भातून भारतीय समाजाकडे व भाषांकडे बघायला हवे.

आपण युरोपीय समाजातील कोणती मूल्ये उचलण्याचा प्रयत्न केला आहे? आपण पाश्चिमात्यांकडून तीन मूल्यकल्पना उचलल्या आहेत, असे सर्वसाधारणपणे म्हणता येईल. त्या उचलताना आपल्या सांस्कृतिक जाणिवांच्या संदर्भात आपण त्या आत्मसात करण्याचा

प्रयत्न केला आहे. एक, पाश्चिमात्य आधुनिकतेची संकल्पना. हिचा पाया बुद्धिवादी व व्यक्तित्ववादी विचाराचा होता. दुसरी, अस्मितेची. याबद्दल अजूनही आपण भारतीय काहीसे गोंधळलेलेच आहोत; पण त्या समाजातील व्यक्तित्ववादातून युरोपात अस्मितेची ही मूल्यसंकल्पना निर्माण झाली आणि तिसरी, राष्ट्रवाद. राष्ट्रराज्य या कल्पनेवर आधारलेली मूल्यकल्पना. या तिन्ही मूल्यांनी मिळून एक युरोपीय आधुनिक जीवनशैली, एक जीवनभान आणि एक राजकीय सत्तेची चौकट निश्चित होते. या सर्व मूल्य कल्पनांचा युरोपीय भाषांवरही मोठा प्रभाव पडला आहे. या तिन्ही गोष्टी आपण भारतात आपल्या परीने काही प्रमाणात उचलण्याचा प्रयत्न केला खरा. पण त्यांचा उगम आपल्या भारतीय परंपरेत नव्हता. त्या सत्त्वतः युरोपीय होत्या. भारतीय म्हणून आपण आपल्या वैचारिक परंपरेतून या कल्पना निर्माण केल्या नाहीत. आपण त्या जशाच्या तशा उचलून आपल्या जाणिवांवर त्याचे कलम करून गेलो. त्यामुळे या संकल्पनांना भारतीय भाषांत देशी शब्द नाहीत. मराठीचंच उदाहरण घ्यायचं, तर हे शब्द 'भाषांतरित' किंवा अर्थपूर्ण विस्तारासहित बनवावे लागतात.

**मराठी भाषेपुढे आज कोणती आव्हाने आहेत?**

प्रबळ राजकीय-सामाजिक इच्छाशक्तीचा अभाव, शासनाचे दुटप्पी शैक्षणिक धोरण, वैज्ञानिक शब्दकोश, वैज्ञानिक विश्वकोश, पारिभाषिक शब्दकोश, विषयवार 'ग्लोसरी', तसेच मूळ वैज्ञानिक व तांत्रिक साहित्याचा मराठीत अनुवाद यांचा संपूर्ण अभाव, आंतरराष्ट्रीय पातळीवर इंग्रजीचा प्रभाव, मराठी माध्यमातून प्राप्त केलेल्या विज्ञान शिक्षणाचे कमी महत्त्व, त्यामुळे नोकऱ्या, व्यावसायिक क्षेत्रात अनिश्चित भवितव्य. अशा प्रकारच्या विविध आव्हानांना आपल्याला तोंड द्यावे लागणार आहे. त्याला सध्या तरी एकच पर्याय होऊ शकतो, आणि तो म्हणजे वैज्ञानिक परिभाषा इंग्रजीमध्येच ठेवून बाकीचे विवरण मराठीत करणे. इंग्रजी भाषेच्या सान्निध्यामुळे आपण तो शब्दसंग्रहही मराठी भाषांतराबरोबर वापरू शकतो. त्याचे प्रमुख कारण म्हणजे तंत्रज्ञान हे केवळ एका देशापुरते मर्यादित नसून सर्व जगात इंग्रजी परिभाषेत पसरले आहे. भारतामध्ये इंग्रजीचा नाही म्हटले तरी एक भक्कम पाया आहे, त्यामुळे जगातील बाकीच्या देशांपेक्षा भारताला - विशेषेकरून संगणकक्षेत्रात भरघोस फायदा झाला आहे. आजच्या तरुण पिढीला ही एक सुवर्णसंधी आहे. परंतु याचबरोबर आधुनिक मराठीच्या विकासासाठी काही ठोस प्रयत्न करण्यात यावेत. उदा० ज्ञानाच्या प्रत्येक शाखेमधील महत्त्वाच्या प्रातिनिधिक साहित्याचे अनुवाद मराठीत व्हावेत. हे अतिप्रचंड काम आहे. त्याला अनेक वर्षे लागतील आणि प्रचंड आर्थिक पाठबळ लागेल. सर्व राजकीय पक्ष, कॉर्पोरेट कंपन्या, बिझनेस हाऊसेस, सार्वजनिक संस्था, बिनसरकारी संस्था, फौंडेशन्स यांच्या संपूर्ण सहकार्यानंच हे कार्य अव्याहतपणे चालत राहील.

**तंत्रज्ञानासाठी भाषेचे सुलभीकरण अपेक्षित आहे का?**

मराठी समाजमनात सध्या घडत असलेलं मराठी-इंग्रजीमधील संक्रमणात्मक द्वंद्व मराठी भाषेला नवीन दिशा देत आहे. शहरी संदर्भामध्ये सर्व महत्त्वाचे व्यवहार म्हणजे विश्वविद्यालयीन शिक्षण व उद्योग क्षेत्रातील व्यवहार इंग्रजीत होत आहेत.

ग्रामीण भागात असे व्यवहार जास्त होत नाहीत. परंतु तेथे मराठी वृत्तपत्रे, मासिके, ललित व तसेच वैचारिक साहित्य यांचा प्रसार मोठ्या प्रमाणावर होत आहे. त्यामुळे मराठीची जोपासना ग्रामीण भागात जास्त चांगल्या रीतीने होत आहे. याचाच फायदा घेऊन ग्रामीण भागातील वाचकांना व अभ्यासकांना सुलभ मराठीत तंत्रज्ञान प्रशिक्षण उपलब्ध करून देता येईल. त्यासाठी दोन गोष्टींची आवश्यकता आहे. (१) भाषेचे सुलभीकरण : विषयातील क्लिष्टता आणि त्यामुळे आलेला भाषेचा बोजडपणा ही प्रत्येक भाषेमध्ये एक समस्या असते. पण तो लेखनशैलीचा भाग झाला. भाषा सुलभ तर व्हावीच. त्याशिवाय ज्ञानवितरण होणे फार अवघड आहे. परंतु त्याहीपेक्षा महत्त्वाची बाब म्हणजे भाषेचे प्रमाणीकरण. हा मराठी भाषेचा एक अत्यंत कमकुवत धागा आहे. बऱ्याच वैज्ञानिक क्षेत्रातील पारिभाषिक संज्ञासुद्धा अजून प्रमाणित नाहीत. तंत्रज्ञान क्षेत्रामध्ये व तसेच सर्वच वैज्ञानिक साहित्यामध्ये एका प्रमाणित भाषेचा उपयोग करणे अत्यंत आवश्यक होऊन बसले आहे. त्यासाठी निरंतर एकभाषी शब्दकोश निर्मिती हा एक अपरिहार्य उपाय आहे. यावर शिक्षणतज्ज्ञांनी किंवा राज्यकर्त्यांनी कधीच धोरणात्मक विचार केला नाही. तसे वेगवेगळे शब्दकोश अनेक मराठी भाषाशास्त्रज्ञांनी तयार केले आहेत, परंतु हे सर्व कोश एकेका व्यक्तींनी केलेले प्रयत्न आहेत. शब्दकोशनिर्मिती हे एका व्यक्तीचे काम नसतं. शब्दकोशाच्या कामाला सातत्य लागतं. हे फक्त संस्थात्मक कार्यातून शक्य होतं. तरच त्याला चिरंतनत्व लाभेल. जगातल्या सर्व विकसित झालेल्या भाषांमध्ये अशा शब्दकोशांचं काम अव्याहतपणे शतकानुशतके चालू आहे. उदा० ऑक्सफर्ड इंग्लिश डिक्शनरी. ही गेले तीनशे वर्षे इंग्रजी भाषेतील शब्दांचा संग्रह करीत आहे. याचप्रमाणे सर्व युरोपीय भाषा आपापले शब्दकोश वाढवीत आहेत. अलिकडेच महाराष्ट्र शासनातर्फे एका मराठी शब्दार्थकोशाचा प्रकल्प चालू केला गेला आहे. पण हे सर्व प्रयत्न अत्यंत तुटपुंजे आहेत. वर म्हटल्याप्रमाणे कोशकार्याला चिरंतनत्व, सातत्य मिळण्यासाठी त्याला संस्थात्मक रचनेची जरुरी आहे.

**तंत्रज्ञान आणि जागतिकीकरणाच्या प्रभावाखाली भारतातील लोकभाषांच्या अस्तित्त्वाला धोका पोचण्याची शक्यता आहे का? बोलींच्या - विशेषतः नामशेष होण्याच्या मार्गावर असणाऱ्या बोलींच्या - जतन-संवर्धनाच्या कामी तंत्रज्ञान कशाप्रकारे मदत करू शकते?**

जगातल्या सर्वच भाषा जागतिकीकरणाच्या दबावाखाली येत आहेत. भारतातील लोकभाषांची स्थिती तर या जागतिकीकरणामुळे आणखीनच दयनीय होणार आहे असे दिसते. परंतु हे केवळ जागतिकीकरणामुळे होत नसून भारतासारख्या बहुभाषिक खंडप्राय देशात अनेक स्थानिक (बोली), क्षेत्रीय (उदा० मराठी) भाषा आणि तसेच राष्ट्रीय व एक विदेशी भाषा (उदा० हिंदी आणि इंग्रजी) या सर्व भाषा एकमेकांबरोबर संघर्ष आणि तसाच संवाद साधत आहेत. या प्रक्रियेमध्ये भारतातील बोलीभाषांवर या सर्व बलाढ्य भाषांचे अनेक आघात होत आहेत, आणि त्यामुळे एक तर त्या बोलीभाषेचे मूळ स्वरूप बदलत जाते किंवा ती हळूहळू तेथील प्रमुख भाषेत विलीन होते. भारतातील सगळ्या लोकभाषांच्या अस्तित्त्वाचा आणि त्यातील प्रत्येक बोलीच्या विकासाचा विचार केला, तर असे लक्षात येईल की अशी स्वैर परिस्थिती देशाच्या सामाजिक आणि राजकीय स्थैर्याला पोषक राहणार नाही. प्रख्यात भाषातज्ज्ञ डॉ० गणेश देवी यांनी भारतीय लोकभाषांवर केलेले महत्त्वपूर्ण काम नुकतेच प्रकाशित झाले. प्रचंड प्रमाणात केलेले सर्वेक्षण आणि हजारो बोलीभाषांची ही माहिती पन्नास खंडांमध्ये एकूण ३५,००० पानांमध्ये प्रसिद्ध करण्यात आली आहे. या कामाला तब्बल दोन दशके लागली. लोकभाषांची नोंदणी करण्याचे यासारखे काम जगाच्या पाठीवर अद्याप इतक्या मोठ्या प्रमाणावर कोठेही झालेले नाही. मराठी खंडाच्या प्रकाशन समारंभावेळी गणेश देवी यांनी स्वातंत्र्यानंतर भारतात घेतल्या गेलेल्या पहिल्या लोकभाषा गणतीबद्दलची एक गमतीशीर गोष्ट सांगितली. या गणतीनुसार, त्या वेळी भारतात एक हजाराहून अधिक बोली भाषा नोंदल्या गेल्या होत्या. हा आकडा पाहून सरकार चक्रावून गेले. त्याचे अनेक राजकीय परिणाम होण्याची भीती वाटू लागली. त्यामुळे बोलीभाषांच्या संख्येवर नियंत्रण ठेवण्यासाठी सरकारने किमान लोकसंख्येचे प्रमाण निश्चित केले. यानुसार किमान दहा हजार लोक एखादी लोकभाषा बोलत असतील तरच तिचा समावेश या यादीत करण्याचा निर्णय झाला. त्यानुसार सर्वेक्षण होऊन भारतात सध्या ७८० लोकभाषांची नोंद करण्यात आली आहे. म्हणजे याचा अर्थ असा की नोंदल्या न गेलेल्या लोकभाषा अस्तित्त्वात नाहीत, असे समजायचे! मानववंशशास्त्रीय दृष्टीतून याचे काय परिणाम होतील याची आत्तातरी कल्पना करता येणार नाही. परंतु अतिशय मौल्यवान भाषिक आणि मानववंशशास्त्रीय माहिती गोळा करण्यासाठी गणेश देवी आणि त्यांच्या सहकाऱ्यांनी कठोर परिश्रम घेतले आणि ही अत्यंत महत्त्वाची सांस्कृतिक संपत्ती देशाला उपलब्ध करून दिली. एवढेच नव्हे, तर देवी यांच्या म्हणण्यानुसार, अशी ही महत्त्वाची माहिती नुसतीच सांस्कृतिक ठेवा नाही, ती एक आर्थिक भांडवलही होऊ शकेल, की ज्याचा उपयोग अनेक भाषातज्ज्ञ, संगणकतज्ज्ञ, मानसशास्त्रज्ञ करू शकतील! अशी शक्यता, जरी दूरची असली, तरी योग्य आणि स्वागतार्ह आहेच. पण आता प्रश्न पडतो : पुढे काय? सध्या तरी बोलीभाषांचे

महत्त्व तात्त्विक स्तरावर मानले गेले असले तरी आजमितीस ते संदेहात्मक आहे. कारण या भाषा शिकून काही शिक्षण अथवा व्यावसायिक कौशल्य मिळवता येत नसल्याने उपजीविकेचे साधन म्हणून बोलीभाषांकडे बघता येणार नाही. अगदी उच्च स्तरावर भाषाशास्त्रीय संशोधन, साहित्यिक वा ललित लेखन, सांस्कृतिक आदान-प्रदान या बाबतीत बोलीभाषा आपले योगदान देऊ शकतील.

याबाबतीत तंत्रज्ञानाचा योग्य प्रकारे उपयोग करून घेता येईल. नामशेष होत चाललेल्या बोलीभाषांचे जतन संगणकामार्फत करणे सहज जमेल. तसेच वेगवेगळ्या बोलीभाषांमुळे एक महत्त्वाचं सांस्कृतिक वैविध्य निर्माण होईल. परंतु ही जरी महत्त्वाची बाब असली तरी वैविध्य टिकविण्याचा आग्रह एका मर्यादेपर्यंतच करता येईल. केवळ वैविध्यासाठी वैविध्य टिकविण्यातून नेमके आपण काय साधणार आहोत, हा प्रश्न अनुत्तरितच आहे. त्यामुळे या संदर्भात भाषानियोजनाची अत्यंत आवश्यकता आहे. लोकभाषांचे सांस्कृतिक महत्त्व ओळखून त्यांचा प्रमुख क्षेत्रीय भाषेच्या 'कार्पस'मध्ये निवडक समावेश करणे योग्य ठरेल. त्यासाठी काही मानदंड ठरवावे लागतील. त्यामागे बऱ्याच बोलीभाषा मुख्य स्रोतात सामावून घेता येतील.

**तंत्रज्ञानामुळे भाषिक व्यवहारात नवनवी क्षेत्रे समाविष्ट होणे शक्य आहे का? कशाप्रकारे?**

तंत्रज्ञानाचे आणखी एक मूळ आणि महत्त्वाचे उद्दिष्ट म्हणजे माहितीची आणि ज्ञानाची वेगवेगळी क्षेत्रे सामान्य जनतेलाही उपलब्ध करून देणे. भारतीय परिप्रेक्ष्यांतून या स्थितीचे अवलोकन केले तर एक सकारात्मक गोष्ट ध्यानात घेता येईल. भाषांच्या या पायाभूत सुविधा (शब्दार्थकोश, पर्यायी शब्दकोश इ०) तंत्रज्ञानाच्या साहाय्याने निरंतर निर्माण करीत ठेवणे व तसेच पारिभाषिक संज्ञांचे कोश विषयवार तयार करून त्या अभ्यासकांना व शास्त्रज्ञांना उपलब्ध करून देणे. तंत्रज्ञानाच्या उपयोगाने ज्ञानाची अनेक दालने उघडणे शक्य आहे.

**आजची तंत्रज्ञानावर प्रभुत्व मिळालेली पिढी मराठीच्या विकासासाठी प्रयत्नशील आहे, असे चित्र दिसते का?**

तंत्रज्ञानावर प्रभुत्व मिळवलेली तरुण पिढी मराठीच्या विकासासाठी मात्र उदासीन आहे. महाराष्ट्रातील मराठी भाषकांनाही मराठीच्या भविष्याबद्दल असुरक्षितता वाटते. याचे प्रमुख कारण म्हणजे आधुनिक मराठी भाषेची अविकसित अवस्था. आंतरराष्ट्रीय भाषांच्या समूहामध्ये मराठीला कुठलेच स्थान नाही. अशा भाषेतून उच्च ज्ञान मिळवणं ही अशक्यप्राय गोष्ट होऊन बसली आहे. ही परिस्थिती बदलण्यासाठी अतोनात परिश्रम

करावे लागतील. त्याला अनेक दशके आणि प्रचंड आर्थिक पाठबळ लागेल. त्यातच मराठीच्या विकासासाठी काही पोषक अशा भाषिक वातावरणाचा अभाव आहे. त्याचप्रमाणे प्रत्येक राज्यामध्ये सध्या बहुभाषिकतेची सरमिसळ चालू आहे. खऱ्या अर्थाने बहुभाषिक असलेल्या समाजामध्ये कोणत्याच एका भाषेची नैसर्गिक वाढ होत नाही. सामाजिक आणि राजकीय सत्तासंघर्षातूनच त्यांचा उदय किंवा ऱ्हास होत असतो. सांप्रत हिंदी व इंग्रजी या दोन प्रोमिनंट भाषा मराठीमध्ये संवाद आणि संघर्ष साधण्याचा प्रयत्न करीत आहेत. या दोन्ही भाषा तुलनेमध्ये मराठीपेक्षा जास्त व्यापक आणि सांस्कृतिकदृष्ट्या आक्रमक आहेत. त्यांचा आवाकाही देशव्यापी आणि विश्वव्यापी आहे. त्यामुळे या दोन्ही भाषांतले शब्द आणि वाक्प्रचार मराठीमध्ये हळूहळू प्रवेश करीत चपखल बसत आहेत. मराठीला त्यादृष्टीनं गौण स्थान प्राप्त होत आहे. साहजिकच व्यावसायिक भवितव्याबद्दल चिंतित असलेली तरुण मराठी पिढी या भाषासंघर्षात भाग घेऊ इच्छित नाही.

**तंत्रज्ञानामुळे एक नवीच भाषा जन्माला येत आहे; हे कितपत खरे आहे? (उदा० मोबाईलवरचे अतिलघुसंदेश, ट्वीटरची भाषा) तंत्रज्ञान हे भाषेवर कुरघोडी करील का?**

हे तितकेसे खरे नाही. भाषा ही कधीही यांत्रिक प्रक्रियेतून जन्माला येत नाही. प्रत्येक भाषा मानवी सर्जनशीलेतून जन्माला येत आली आहे. भाषा ही मानवी, भावनिक निर्मिती आहे. मानवी भाषा ही एका विशिष्ट सांस्कृतिक संदर्भातून व वेगवेगळ्या ऐतिहासिक घटनांच्या आठवणीतून आकार घेत जाते. या प्रक्रियेला अतिशय मोठा काळ लागतो. कमीतकमी एकदोन शतके तरी. हे आपल्याला भाषांच्या इतिहासावरून लक्षात येईल. भाषा निर्माण करण्याचे कृत्रिम प्रयत्न बरेच झाले आहेत. टेलिग्राफिक संदेश, लघुसंदेश, ट्वीटरची भाषा, हाही त्यातलाच भाग. खऱ्या अर्थाने या भाषा नव्हेत; पण काही उत्साही लोकांनी 'एस्पेरान्टो' ही एक कृत्रिम भाषा बनवली आहे. वेगवेगळ्या देशांतील अनेक लोक या भाषेतून एकमेकांबरोबर संवाद साधतात. जगामध्ये अनेक एस्पेरान्टो क्लब्स आहेत. हा एक 'होबी क्लब' आहे. या अशा तथाकथित भाषा जास्त काळ टिकू शकल्या नाहीत. कारण त्यात मानवी मनाचे उन्मेषाचे पापुद्रे उलगडणे व त्यातून वेगवेगळ्या भावना प्रकट करणे किंवा व्यक्त होणे कठीण होते. त्यासाठी भाषेला खोल ऐतिहासिकतेची आवश्यकता लागते. कारण भाषा ही एक सांस्कृतिक आठवण (कल्चरल मेमरी) आहे. त्यात युगायुगांच्या मानवी मनाच्या आणि जीवनाच्या वेगवेगळ्या पातळ्यांवरून झालेल्या जीवनसंघर्षाचे 'आर्किटायपल'(आदिबंधात्मक)चित्र दडलेले असते. ते उलगडून दाखवणं आणि भाषेत प्रतिबिंबित करणं हे कवीच्या आंतरिक प्रतिभेवर अवलंबून असतं. म्हणूनच कितीही तांत्रिक प्रगती झाली तरी ती आपल्या भावविश्वाचा वेध घेऊ शकणार नाही.

**आपल्याकडील प्रादेशिक भाषा आधुनिकतेच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर आहेत. त्यांचा विकासाचा आलेख वेगवेगळा आहे. अशा वेळी तंत्रज्ञान त्यांना कशाप्रकारे मदत करू शकते?**

आजच्या भारतीय भाषांची एक सामाईक समस्या आहे, ती म्हणजे उच्च शिक्षण, वैज्ञानिक संशोधन, आंतरराष्ट्रीय व्यापार या सर्व आधुनिक व्यवहारासाठी आवश्यक असलेली योग्य भारतीय भाषा सध्या तरी सुसज्ज नाही. त्यासाठी आवश्यक असलेली पायाभूत सुविधा (शब्दकोश, भाषांतरे) निर्माण करण्यासाठी तंत्रज्ञानाचा उपयोग अपरिहार्य होणार आहे.

**यांत्रिक भाषांतराविषयी आपले काय मत आहे? संगणकाला नैसर्गिकपणे मानवी भाषा शिकवली जाणे नजीकच्या काळात संभवनीय आहे का?**

सध्या असे प्रयत्न आणि प्रयोग जगामध्ये बऱ्याच देशांत चालू आहेत. तात्त्विक पातळीवरून विचार करताना असे दिसून आले आहे की प्राचीन काळापासून मनुष्य आपल्या बुद्धिमत्तेच्या जोरावर एक प्रतिसृष्टी व प्रतिमानव निर्माण करण्याचं स्वप्न बाळगून आहे. यंत्रातून मानवी भाषा निर्माण करणे हाही त्याच स्वप्नाचा भाग. अनेक संगणकशास्त्रज्ञ या बाबतीत बरेच पुढे गेलेले आहेत. अशा प्रयोगांमध्ये भाषांच्या मूळ स्वरूपाचे विश्लेषण वेगवेगळ्या व्याकरणांच्या (उदा० पाणिनी) मदतीने करण्याचे प्रयत्न चालू आहेत.

**अनुवादासाठी तंत्रज्ञान उपकारक ठरू शकते, अर्थात त्यासाठी भाषेची किमान पातळीवरची पायाभूत सिद्धता हवी असते. (उदा० पर्यायी शब्दकोश आणि व्याकरणग्रंथ) मराठीबाबतची स्थिती यादृष्टीने आपणास समाधानकारक वाटते का?**

भाषेचा विकास आणि एकभाषीय शब्दार्थकोशनिर्मिती यांचा अन्योन्य घनिष्ठ संबंध आहे. सतत बदलत जाणाऱ्या समाजामध्ये भाषेला एक गतिशील सातत्य (डायनोमिक कंटिनुअम) लाभलेलं असतं... हे सातत्य टिकवून ठेवण्यासाठी शब्दकोशांची गरज लागते. कोशात भाषाप्रवाहातली निसटती रूपं संग्रहित आणि बंदिस्त केली जातात. त्यातून भाषेच्या प्रमाणीकरणाच्या प्रक्रियेस प्रारंभ होतो. तत्त्वत: कुठल्याही भाषेच्या विकासासाठी वेगवेगळ्या शब्दकोशांची नितांत आवश्यकता असते. मराठीच्या बाबतीत तर हे अत्यंत गरजेचं आहे. हे अजूनही भाषाधोरण ठरविणाऱ्या नियोजकांना तितकेसे लक्षात आलेले दिसत नाही. तसे पाहता मराठी भाषेत अनेक शब्दकोश गेल्या शतकापासून तयार केले गेले आहेत. ते सर्व जुजबी उपयोगासाठी ठीक आहेत. ते सर्व एकेका व्यक्तींनी संग्रहित केलेले प्रयत्न आहेत. त्यामुळे त्या शब्दकोशांना ऐतिहासिक सातत्य व चिरंतनत्व नाही. शब्दकोशनिर्मिती ही सातत्याने चालू राहणारी अखंड क्रिया आहे. माझ्या मते संस्थात्मक

शब्दकोशनिर्मितीचा (लेक्सिकोग्राफी) संपूर्ण अभाव हे भारतीय भाषांच्या मागासलेपणाचं प्रमुख कारण आहे.

जर्मनीमध्ये मुलांना इतर पाठ्यपुस्तकाबरोबरच जर्मन भाषेचा एक भाषाकोश एक महत्त्वाचं शैक्षणिक साधन म्हणून पुरवला जातो. मुलांना पहिल्यापासून कोशात शब्द बघायची सवय लावली जाते. त्यामुळे शब्द वापरताना अर्थाविषयी संदिग्धता राहत नाही. भाषाविकासासाठी शब्दार्थाचं प्रमाणित प्रयोजन शाळेच्या चाकोरीतूनच केलं जातं. एकभाषाकोश अशा रीतीने मातृभाषेतील प्रमाणित रूपं कळण्याच्या कामी आपली भूमिका बजावतो.

बहुतेक सर्व युरोपीय भाषांमध्ये एकोणिसाव्या शतकात शासनाच्या मदतीने किंवा मदतीशिवायही कोशरचनेचे प्रकल्प हाती घेतले गेले. या कामात मनापासून रस घेऊन कोशकार आणि भाषावैज्ञानिकांनी शास्त्रीयदृष्ट्या महत्त्वाचं सहकार्य केलं. इथं उदाहरणादाखल जर्मन भाषेचा उल्लेख करता येईल.

जर्मन भाषेला सतराव्या शतकात एका न्यूनभावानं पछाडलेलं होतं. आपल्याला अस्खलित फ्रेंच बोलता येतं याचीच जर्मन खानदानी मंडळी त्या वेळी पौढी मिरवायची, असं म्हणतात, की प्रशियाचा राजा फ्रेडरिक महान याच्यावर फ्रेंच संस्कृतीचा इतका पगडा होता, की त्याने फ्रेंच ही जवळजवळ जर्मनीची राजभाषाच करून टाकली होती! पण अठराव्या आणि एकोणिसाव्या शतकात जर्मन लेखक आणि कवी, भाषावैज्ञानिक आणि कोशकार यांनी फार मोठी जोखीम वाहून अगदी प्राचीन काळापासून जर्मन भाषेचं वैभव आणि वाङ्मयसंपत्ती संग्रहित आणि ग्रथित करून ठेवली; कोशं, ज्ञानकोश आणि इतर संदर्भग्रंथ संपादित करून अनेकविध परकीय भाषांतून तसंच संस्कृतमधूनही मोठ्या प्रमाणात भाषांतर करून स्वभाषा समृद्ध केली. अशा रीतीने जर्मन पंडित आणि विद्वानांनी सर्वसामान्य जनतेचा आपल्या भाषेविषयीचा विश्वास आणि स्वाभिमान पुन्हा प्रस्थापित केला. या प्रयत्नांमधून जर्मन वाङ्मय रचनेसाठी त्यांनी प्रचंड शब्दसंपत्तीचा भक्कम पाया घातला. त्यामुळे भाषा व्यवहाराच्या कोणत्याही क्षेत्रात जर्मन भाषेतून लेखन करण्याची सोय झाली.

दुसरी गोष्ट म्हणजे आतापर्यंत भारतात तयार झालेले बहुतेक सर्व शब्दकोश हे द्वैभाषिक कोश आहेत. एका प्रमाणित भाषेतून उच्च शिक्षणासाठी लेखन करण्यासाठी महत्त्वाची 'प्रीरेक्विझिट'/अट म्हणजे एकभाषीय शब्दार्थकोशांची निर्मिती. भारतात शब्दकोशशास्त्र हे सर्वात महत्त्वाचे; परंतु सर्वात दुर्लक्षित क्षेत्र. त्यामुळे भारतीय भाषांच्या प्रमाणीकरणाला व विकासाला मर्यादा पडल्या आहेत. अशा शब्दकोशांच्या अभावामुळे प्रमाणित भाषेच्या वापरामध्ये शाब्दिक पोकळी निर्माण झाली आहे. ही पोकळी इंग्रजी शब्दांनी भरून काढली जात आहे. अन्यथा आपल्याच भाषेमधले व्यवहारातील नेटीव

शब्द अधिकारवाणीनं वापरले गेले असते, तर आतापर्यंत ते भाषेत रुजले असते आणि सर्वसामान्य जनतेनं वापरले असते. भारतामध्ये फारच कमी भाषांमध्ये शब्दकोशांची परंपरा चालू आहे, की ज्यामुळे वैचारिक, ललित आणि वृत्तपत्र लेखनासाठी एक महत्त्वाची सुविधा प्राप्त होऊ शकेल.

मातृभाषेत सर्जनशील, विद्वत्तापूर्ण किंवा वृत्तपत्रीय अशा कोणत्याही स्वरूपाचं लिखाण करण्यासाठी आवश्यक अशी एकभाषाकोशाची परंपरा भारतीय भाषांमध्ये अभावानेच आढळते. द्विभाषाकोश किंवा बहुभाषाकोश किंवा विशेष शब्दसूचींची रचना याची एक सातत्यपूर्ण परंपरा अमुक एका भारतीय भाषेत निर्माण झाली आहे, असं कोणत्याही भारतीय भाषेबाबत अभिमानाने म्हणता येणार नाही. फक्त काही तुरळक आणि खाजगी धंदेवाईक स्वरूपाचे प्रयत्न काय ते याला अपवाद आहेत.

भाषा जसं रूप धारण करते, तसं तिचं प्रतिबिंब कोशात उमटतं. म्हणूनच एकभाषा-कोशाच्या अवलोकनावरूनच एखाद्या भाषेच्या विकासाचा दर्जा ठरविता येतो. किंबहुना फक्त विकसित भाषांमध्येच एकभाषाकोशाची निर्मिती होऊ शकते. एखाद्या भाषेच्या समृद्धीचा आणि विकासाचा आढावा घ्यायचा असेल, तर आपण तिच्या एकभाषीय शब्दकोशांवर नजर टाकावी. त्यावरून त्या भाषेतील शब्दप्राप्ती व तिचा शब्दवापर याचा अंदाज आपल्याला येईल. अर्थात भाषेच्या समृद्धीची कल्पना केवळ तिच्या शब्दसंख्येवरून करणे भ्रामक ठरेल. लोकांमधील वेगवेगळ्या क्षेत्रांत व वेगवेगळ्या पातळीवरून केलेल्या परस्पर भाषिक संवादातून खरोखरची भाषावृद्धी होते. त्यातून नवनवीन संदर्भ निर्माण होतात व त्यातून नवीन शब्दनिर्मिती होते. अशा ह्या निर्मितीतील नावीन्यपूर्ण शब्दस्रोताला स्थैर्य देण्याचे निरंतर काम पिढ्यान् पिढ्या शब्दकोश करीत राहतो. हेच महत्त्वाचे आहे. हे एका व्यक्तीचे काम नव्हे.

कोशनिर्मिती हे एक अविरत चालणारे कार्य आहे. समाजजीवनाच्या सर्व क्षेत्रांत भाषाव्यवहार शक्य व्हावा, म्हणून मुबलक शब्दसंपत्ती निर्माण होऊन, ती रुळून, तिचं प्रमाणीकरण होण्यासाठी कोशरचनेचं काम संस्थात्मक पद्धतीने आणि सातत्याने चालू राहणं आवश्यक आहे. कोशकारितेचं भाषाविकासातील अनन्यसाधारण महत्त्व भारतीय प्रादेशिक भाषांच्या संदर्भात आपण लक्षातच घेतलेलं दिसत नाही.

या संदर्भात आपण जर्मन भाषेच्या विकासातल्या टप्प्यांचं निरीक्षण करू. तिच्या विकासासाठी दोन शतकांपूर्वीच कसे जाणीवपूर्वक प्रयत्न केले गेले, याचं उदाहरण विचारात घेता येईल. जर्मन विद्यापीठांमध्ये वैज्ञानिक क्षेत्रात असलेली लॅटिनची मक्तेदारी हळूहळू कमी होऊ लागली. तिचं स्थान जर्मन भाषा घेऊ लागली, कारण या काळात जर्मनमध्ये प्रचंड प्रमाणावर वैज्ञानिक परिभाषाकोशांची निर्मिती झाली. त्यामुळे विज्ञानविषयक व तंत्रविद्याविषयक पारिभाषिक जर्मन प्रतिशब्द रुळले. मुख्यत: भाषावैज्ञानिक आणि

कोशकार यांनी अशा रीतीने एकोणिसाव्या शतकात जर्मन भाषेच्या भावी उत्कर्षासाठी भरभक्कम चौकट निर्माण केली. पण याचबरोबर 'स्वभाषाविकास' म्हणजे परभाषांचा अव्हेर किंवा दुस्वास नाही, हेही लक्षात घेतले पाहिजे. इथे प्रसिद्ध कोशकार नोआ वेब्स्टर याने घातलेल्या 'संकलनाच्या आणि विभाजना'च्या तत्त्वाचा उल्लेख करता येईल. अमेरिकन भाषेच्या प्रमाणीकरणासाठी वेबस्टरनं कोशाचं माध्यम वापरलं. तेव्हा त्यानं फक्त अमेरिकन वाङ्मयीन नमुन्यांवरून शब्दसूची तयार केली आणि ब्रिटिश नमुन्यांचा अव्हेर केला. हे विभाजनाचं तत्त्व आणि भाषाशुद्धीकरणाचा दुराग्रह भाषाविकासाला मारक ठरेल, हे मराठी-कोकणी किंवा हिंदी-उर्दूच्या उदाहरणांवरून स्पष्ट करता येईल.

लॅटिन भाषेचे ज्ञानभाषा म्हणून मध्ययुगापासून युरोपभर पसरलेले महत्त्व हळूहळू कमी होत जर्मन भाषेला सतराव्या शतकापासून ज्ञानभाषा म्हणून महत्त्व येऊ लागले. त्याचे सर्वात महत्त्वाचे कारण म्हणजे जर्मन पारिभाषिक संज्ञांची प्रचंड संग्रहनिर्मिती व त्यांचं प्रमाणीकरण. अशा तऱ्हेनं जर्मन भाषाशास्त्रज्ञ व शब्दकोशकार यांनी प्रामुख्याने एकोणिसाव्या शतकात आवश्यक अशी जर्मन एकभाषीय शब्दकोशांची पायाभूत सुविधा जर्मन भाषेच्या विकासासाठी निर्माण केली आणि ती तशीच आजतागायत प्रभावीपणे चालू आहे. एवढेच नव्हे तर या शब्दकोशांच्या वेगवेगळ्या विशेष आवृत्त्या काढून समाजातील वेगवेगळ्या जनसमुदायांनी, खास करून शालेय विद्यार्थ्यांनी शब्दकोश वापरण्याची संस्कृती तिथे निर्माण केली आहे.

**आपल्या देशात असंख्य भाषा बोलल्या जातात. भाषावैविध्य हे आपल्या बहुसांस्कृतिकतेचे एक वैशिष्ट्य मानले जाते. जैववैविध्य या संकल्पनेला आज पर्यावरण-विज्ञानात जे महत्त्व आहे. तसे महत्त्व भाषावैविध्यालाही मिळणे आवश्यक आहे का? अनेक भाषा या आपल्यासाठी विकासाची बलस्थाने आहेत की मर्यादा आहेत?**

खऱ्या अर्थाने बहुभाषिक असलेल्या समाजामध्ये कोणत्याही एका भाषेची नैसर्गिक वाढ होत नाही. सामाजिक आणि राजकीय सत्तासंघर्षातूनच त्यांचा उदय होत असतो. यासाठी आलोक राय यांनी उत्तर भारतामधील ब्राह्मण आणि कायस्थांच्या सत्तासंघर्षातूनच एकोणिसाव्या शतकात तयार झालेल्या आधुनिक शुद्ध हिंदीचे उदाहरण दिले आहे. सभोवताली असलेल्या स्थानिक बोलीभाषा मात्र या संघर्षात टिकू शकल्या नाहीत. त्या हळूहळू मागे पडत चालल्या आणि ग्रामीण भागात काही अंशी तग धरू शकल्या. परंतु त्याच काळात इंग्रजीने भारताच्या सांस्कृतिक आणि सामाजिक वातावरणात शिरकाव केला आणि तिने उच्चपदस्थ लोकांच्या व्यवहारांमध्ये मानाचे स्थान मिळवले. परंतु अशा बलाढ्य भाषेला तोंड देऊ शकणारं आणि भारतासारख्या विविध जाती व धर्म यांनी

वरून खालपर्यंत दुभंगलेल्या खंडप्राय देशाला एकवटू शकणारं सामर्थ्य कोणत्याही एका भारतीय भाषेमध्ये नव्हतं की जी सगळ्या देशाची सामाईक भाषा होऊ शकेल आणि देशाला एकसंध बहुसांस्कृतिकता म्हणून मान्यता मिळवून देऊ शकेल! परंतु भारतीय इतिहासात समाजाची किंवा देशाची एकसंधता हा कधीच जिव्हाळ्याचा विषय नव्हता. त्याचे प्रमुख कारण म्हणजे असंख्य जातीमध्ये आणि बोलींमध्ये अडखळलेली आणि विखुरलेली समाजव्यवस्था. याउलट, भारतातील सत्ताधीशांची भाषा ही इतर सामान्य जनतेपेक्षा नेहमीच वेगळी राहिली आहे. आधी संस्कृत, मग पर्शियन (फार्सी) आणि आता इंग्रजी. त्यामुळे कुठल्याही भारतीय भाषेच्या विकासासाठी कुठल्याही भारतीय सत्ताधीशाने प्रयत्न केले नाहीत, उलट राज्याचे सर्व व्यवहार फारसी किंवा इंग्रजीत उरकले जात असत आणि अजूनही जात आहेत.

एकभाषिक राष्ट्र म्हणून विकास झालेल्या युरोप आणि आशियातील देशात अशी अडचण निर्माण झाली नाही. उलट त्यांनी इंग्रजी, फ्रेंच, जर्मन, रशियन, स्पॅनिश, जपानी, चिनी, कोरियन, पर्शियन, तुर्की यांसारख्या आपापल्या भाषांचा वापर करूनच आधुनिकतेच्या मार्गावर पाऊल ठेवले. या भाषांचा त्यांच्या त्यांच्या देशात सर्व शालेय आणि उच्च शिक्षण, संशोधन, व्यापार, प्रशासन, तंत्रज्ञान यासारख्या आघाडीच्या आधुनिक वैज्ञानिक क्षेत्रांमध्ये पूर्णपणे वापर करण्यात आला. त्यामुळे त्या भाषा खऱ्या अर्थाने परिपक्व राष्ट्रीय भाषा झाल्या. या तऱ्हेने सामान्य नागरिकांच्याच भाषेला प्रमाणित दर्जा प्राप्त होऊन देश एकसंध होण्यास मदत झाली. या प्रक्रियेत या देशांचे एकजीव एकभाषिक समाजामध्ये रूपांतर झाले आणि त्यातून एकभाषिक राष्ट्रे निर्माण झाली.

अशी प्रक्रिया भारतात घडू शकली नाही. आधुनिक विज्ञानामध्ये आणि तंत्रज्ञानामध्ये वापरता येण्याजोगी वैज्ञानिक भाषा भारतात बाळसे धरूच शकली नाही. त्याहीपेक्षा महत्त्वाचे : भारतातील लोहार, सुतार, चांभार, शेतकरी, सोनार यांच्यासारख्या परंपरागत कारागीरांच्या त्यांच्या व्यवसायातील विशिष्ट शब्दभांडाराला आपल्या 'कॉर्पस'मध्ये सामील करून घेऊन कौशल्यपूर्ण रीतीने आपल्या भाषेला सर्वसमावेशक आणि व्यापक बनवले नाही आणि अशाप्रकारे तिचा विकास आणि प्रसार करण्याचा आपण कधी प्रयत्नच केला नाही. त्याचे मुख्य कारण म्हणजे भारताची जातिनिहाय दुभंगलेली समाजरचना. त्यामुळेच भारत आम जनतेसाठी आधुनिक विद्यापीठे, जी सर्वांना प्रवेश देऊ शकतील, उभी करू शकला नाही. त्याऐवजी फक्त निवडक उच्चभ्रू लोकांनाच प्रवेश देणारी आणि विज्ञान आणि तंत्रज्ञानाकडे दुर्लक्ष करणारी गुरुकुल पद्धतीच भारतात रुजली. काही विद्वान लोक आपल्याकडे तक्षशिला, नालंदा या दोन बौद्धकालीन विद्यापीठांचा आपल्या भाषणात वारंवार उल्लेख करतात. बौद्ध धर्म भारतात टिकला असता तर कदाचित भारतामध्ये बुद्धिप्रामाण्यावर आधारलेली समाजरचना रुजली असती, तेव्हा कदाचित भारतात





अनुक्रमणिका

विश्वविद्यालये स्थापित झाली असती. तसे घडले नाही. परंतु ही दरी ब्रिटिशांच्या आगमनापर्यंत तशीच कायम राहिली. ती ब्रिटिश सत्ताधीशांनी भरून काढली. त्यांनी १८५७ साली भारतात विद्यापीठांची स्थापना करून भारतीय पारंपरिक संस्कृतीत पाश्चिमात्य विज्ञान आणि तंत्रज्ञान इंग्रजी भाषेत रुजविले. त्यामुळे इंग्रजी भाषेला भारतात एक वेगळेच स्थान व महत्त्व मिळाले. इंग्रजीला आधुनिक ज्ञानभाषेचा दर्जा मिळालाच होता. त्यामुळे सर्व उच्च विज्ञान शिक्षण इंग्रजीतूनच देण्यास आरंभ झाला. परंतु त्यामुळे विज्ञान आणि तंत्रज्ञान यातील पारिभाषिक संज्ञांचा शब्दसंग्रह भारतीय भाषाक्षेत्राच्या बाहेर राहिला. त्याचा घोर परिणाम आज आपण भोगत आहोत.

यामुळे आज भारतातील सर्व भाषा फक्त काही जुजबी दैनंदिन आणि घरगुती व्यवहारासाठी उपयुक्त ठरण्याइतपतच मर्यादित राहिल्या आहेत. उच्चस्तरीय ज्ञानासाठी इंग्रजीचाच सर्वस्वी उपयोग होत आहे. इंग्रजीची सोय नसणाऱ्या आणि स्थानिक भाषांमध्ये शिकणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी विज्ञानातील मूलभूत गोष्टी भाषांतरित करून शिकविल्या जातात. पण कोणत्याही उच्च दर्जाच्या अभ्यासक्रमासाठी अथवा संशोधनासाठी या भाषांतरित पुस्तकांचा उपयोग केला जात नाही. बऱ्याच भारतीय शास्त्रज्ञांना तर भारतीय भाषांमधून विज्ञान वाचणे किंवा शिकणे हे अनैसर्गिक वाटते आणि अनेकदा तर तो सभागृहामध्ये एक हास्यास्पद प्रकार ठरतो. कारण आपल्याला माहीत आहे की, खरा भारतीय शास्त्रज्ञ 'कार्बन डाय ऑक्साईड' या शब्दासाठी 'कर्बद्विप्राणील वायू' या पारिभाषिक संज्ञेचा वापर करणार नाही. प्रयोगशाळेच्या बाहेर तो शास्त्रज्ञ आपल्या सहकार्यांबरोबर भले मराठी किंवा तेलुगू किंवा त्याच्या मातृभाषेत गप्पा मारेल! म्हणूनच राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय स्तरावर वैज्ञानिक चर्चांसाठी भारतीय भाषा या कमी दर्जाच्या समजल्या जातात. उच्च विज्ञान आणि तंत्रज्ञानाशी जुळवून न घेणाऱ्या भारतीय भाषा फक्त कविता, कथा, कादंबरी, नाटक किंवा अध्यात्म या बाबींपुरत्याच मर्यादित राहण्याची चिन्हे दिसत आहेत. भारतीय भाषेत विज्ञान आणि तंत्रज्ञानामध्ये अभ्यास किंवा संशोधन करण्याचा प्रयत्न केला तर तुम्ही संपल्यात जमा आहात. अशा अत्यंत सूक्ष्मपणे बदलणाऱ्या परिस्थितीत भारतीय भाषांचं भविष्य काय असणार हा अतिशय काळजीचा प्रश्न आहे. त्यांच्यावर परभाषेचे अतिक्रमण होऊन त्या त्यांचे मूळ स्वरूप हरवून तर बसणार नाहीत? त्यांच्या अभिजात आणि आधुनिक शब्दसंग्रहातून समाजातील भिन्न भिन्न घटकांच्या अभिव्यक्तीचे प्रतिबिंब दृग्गोचर झाले पाहिजे. तरच या सर्व प्रक्रियेमधून या भाषांना समाजाभिमुख आणि प्रमाणीकृत वाढ होण्याची संधी मिळेल. परंतु निदान आजच्या मितीला तरी हा प्रश्न बराच काळ अनुत्तरित राहील. पुणे विद्यापीठात भौतिकशास्त्रातील किंवा रसायनशास्त्रातील पीएच०डी०चा शोधग्रंथ मराठीत सादर होणे कधीतरी शक्य होईल का?

**आपण आमच्या वाचकांना कालानुरूप असा कोणता संदेश द्याल?**

भारत हा बहुभाषिक देश आहे. त्याचबरोबर भारताचे आजच्या तंत्रज्ञानयुगात आंतरराष्ट्रीय क्षेत्रात मोठे स्थान आहे. देशांतर्गत संबंधांमधील देवाणघेवाण आपल्या भारतीय भाषांतून होणे स्वाभाविक आणि आवश्यक आहे. तसेच आंतरराष्ट्रीय क्षेत्रातही भारतीयांचे इतर देशांबरोबर संबंध वाढत आहेत. या सर्व आदानप्रदानात देशी व विदेशी भाषांचे एक महत्त्वाचे योगदान आहे. दुसरी महत्त्वाची गोष्ट म्हणजे येत्या २५ ते ३० वर्षात भारताची एक नवी तरुण पिढी सर्व जगभर कार्यरत होईल. तिला त्या वेळी एक आंतरराष्ट्रीय आव्हान आणि जबाबदारी स्वीकारावी लागेल. कारण त्या वेळी जगातील इतर देशांतील लोकसंख्या वार्धक्याच्या उंबरठ्यावर असेल. भारताच्या येत्या पिढीला ही मोठी सुवर्णसंधी आहे. त्यासाठी तिला मोठी अद्ययावत तयारी करावी लागेल. नुसत्या भारतीय भाषाच नव्हे तर जगाच्या पाठीवरील वेगवेगळ्या भाषा (केवळ जर्मन, फ्रेंच, जपानी नव्हे) आत्मसात केल्या जाव्यात. कारण या पृथ्वीतलावर असे अनेक देश आता आत्मनिर्भर होण्याच्या मार्गावर आहेत की ज्यांना आंतरराष्ट्रीय क्षेत्रात भारतासारख्या प्रगत राष्ट्राकडून मदतीची आवश्यकता वाटेल आणि भारताबरोबर एक मित्रदेश म्हणून सांस्कृतिक संबंध वाढवण्याची व व्यापारात एक विश्वासू 'पार्टनर' मिळवण्याची इच्छा बाळगतील.

स्वातंत्र्योत्तरकाळात भारताची प्रांतवार पुनर्रचना झाली. पण भाषाविषयक धोरण आणि प्रादेशिक भाषांचा विकास याविषयी वाद मात्र अजूनही चालूच आहेत. या सगळ्या चर्वितचर्वणात आपण एक गोष्ट साफ विसरूनच गेलो आहोत, की एखादी भाषा लोक बोलत राहिले, लेखक त्या भाषेत लिहीत राहिले, आणि भाषावैज्ञानिक आणि कोशकार त्या भाषेविषयी सातत्याने नोंदी करीत राहिले, तरच ती भाषा जगू शकते आणि वृद्धिंगत होऊ शकते. ■

**डॉ० प्रमोद तलगेरी**
टपाल-पत्ता : व्हाइस चॅन्सलर, इंडिया इंटरनॅशनल मल्टिव्हर्सिटी, 1ए, I स्पेस, बावधन खुर्द, ऑफ मुंबई-पुणे बायपास रोड, पुणे 411 021.
चलभाष : 099229 14392 ई पत्ता : pramodtalgeri@yahoo.com

# बोलक्या शब्दकोशांचे संकेतस्थळ

कल्पना कुलकर्णी

संगणक व माहिती तंत्रज्ञानामुळे ज्ञान-संपादनाच्या क्षेत्रात आज अनेक क्रांतिकारक बदल घडताना आपण पाहतो. ज्ञान किंवा माहिती सर्वांना सर्वत्र आणि सर्वकाळ उपलब्ध करून देणे, हे या नवीन तंत्रज्ञानाचे उद्दिष्ट आहे. हे उद्दिष्ट साध्य करताना माहिती ज्या भाषेतून उपलब्ध आहे ती भाषा अवगत नसणे हा एक मोठा अडसर ठरू शकतो. जगभर पसरलेल्या मानवी समूहांमध्ये आज इतक्या भाषा प्रचलित आहेत की त्यातील भेद व अंतर पार करून संगणकावर माहितीचा साठा व आदान-प्रदान करणे हे आधुनिक तंत्रज्ञानापुढचे एक मोठे आव्हान आहे. यासाठी भाषांतराचा आश्रय घेणे क्रमप्राप्त ठरते. भाषांतराला स्वतंत्र ज्ञानशाखेचा दर्जा देऊन तिचा विकास करण्याची गरज जागतिक पातळीवर भासते आहे. भाषांतराच्या पारंपरिक पद्धतींना तंत्रज्ञानाची जोड देऊन त्यांचा संख्यात्मक व गुणात्मक विकास करण्याबरोबरच 'स्थलकालातीत सहज उपलब्धता', 'गतिमानता' यासारख्या परिणामांचा विचारही भाषांतराच्या संदर्भात होत आहे. (या दृष्टीने आंतरराष्ट्रीय व राष्ट्रीय पातळीवर अनेक प्रकल्प कार्यान्वित आहेत. अमेरिकेतील 'यू०एन०एल०' व भारतातील 'एम०के०सी०' या दोन प्रकल्पांचा उल्लेख करता येईल.) भाषांतराच्या प्रक्रियेत संबंधित भाषेतील शब्दसंपदा उपलब्ध करून देणाऱ्या शब्दकोशांची भूमिका अत्यंत महत्त्वाची ठरते. कमालीचे भाषावैविध्य असणाऱ्या व भाषावार राज्यांमध्ये विभागलेल्या भारतात तर अशा शब्दकोशांची गरज तीव्रतेने भासते. महाजालावर असे शब्दकोश उपलब्ध करून देण्याचे काही तुरळक प्रयत्न होताना दिसतात. 'लँग्वेज नेटवर्किंग' या सामाजिक-शैक्षणिक प्रकल्पाचा भाग असणारे 'खांडबहाले डॉट कॉम' (khandbahale.com) हे संकेतस्थळ आधुनिक तंत्रयुगाला साजेल अशा बोलत्या शब्दकोशांचा प्रस्ताव आपल्यापुढे मांडते. भारतातील प्रमुख भाषांतील शब्दकोश 'ऑन लाइन' उपलब्ध करून देणे हे या संकेतस्थळाचे उद्दिष्ट आहे.

अभियांत्रिकीचा अभ्यास करताना इंग्रजी भाषा अवगत करून घेण्याच्या वैयक्तिक गरजेतून खांडबहाले यांना या संकेतस्थळाची कल्पना सुचली. भाषाशास्त्रज्ञ, विषयतज्ज्ञ व शैक्षणिक संस्थांच्या सहकार्याने त्यांनी या संकेतस्थळाची स्थापना केली. मराठीतून इंग्रजी व इंग्रजीतून मराठीसह इतर चौदा भारतीय भाषांचे बोलते शब्दकोश तयार करण्याचा त्यांचा मानस आहे. त्यात नेपाळी, बंगाली, संस्कृत, संथाली, उर्दू, तमिळ, तेलुगू, डोंगरी, गुजराती, हिंदी, कोंकणी आदी भाषांचा समावेश आहे.



अनुक्रमणिका

तंत्रज्ञानापेक्षा भाषांतराशी जवळिक असलेल्या भाषा-अभ्यासकाच्या दृष्टिकोनातून या संकेतस्थळासंबंधी काही निरीक्षणे मी पुढे नोंदवीत आहे. आज ज्या स्वरूपात हे संकेतस्थळ उपलब्ध आहे त्यावरून सध्यातरी त्याचा भर खांडबहाले यांच्या बोलत्या शब्दकोशांच्या संकल्पित प्रकल्पाची माहिती व आराखडा देण्यावर आहे असे वाटते. संकेतस्थळावर दिलेल्या यादीतील सर्व भारतीय भाषांचे शब्दकोश अजून संकेतस्थळावर उपलब्ध नाहीत. शब्दकोश व सॉफ्टवेअर या दोन्ही दृष्टीने ते जास्तीत जास्त उपयुक्त बनवण्याचा खांडबहाले यांचा मानस आहे.

संकेतस्थळावर क्लिक केल्यानंतर येणाऱ्या माहितीपर पानावरून संकल्पित प्रकल्पाचा आराखडा व आवाका लक्षात येतो. एकूण मांडणीमध्ये सुरुवातीला संबंधित भाषेविषयी सर्वसामान्य माहिती दिलेली आहे. भाषाकुल, भाषकांची संख्या, लिपी, भाषा कुठे बोलली जाते व कुठल्या प्रदेशांची राज्यभाषा आहे इ० माहिती त्यात येते. उर्दू भाषेची माहिती देताना स्वातंत्र्योत्तर काळात उर्दू भाषक व हिंदी भाषकांत निर्माण झालेल्या दुफळीचाही उल्लेख येतो. शब्दकोशाची गाभात्मक वैशिष्ट्ये तक्त्याच्या स्वरूपात दिली आहेत. त्यामध्ये शब्दांचे उच्चार, अनेकविध अर्थ, समान व विरुद्धार्थी शब्द, ऐतिहासिक पार्श्वभूमी, व्युत्पत्ती, व्याकरण, लिंग व वाक्प्रचारातील उपयोग यांचा समावेश आहे. (प्रत्यक्षात व्युत्पत्ती किंवा ऐतिहासिक पार्श्वभूमी यासंबंधी शब्दांचे तपशील आढळले नाहीत) शब्द पारंपरिक पद्धतीने आद्याक्षराच्या वर्णमालेतील क्रमानुसार दिलेले असून त्यांची संख्या चार लाख असल्याचे नमूद केले आहे. शब्दार्थ देताना सर्व-अर्थ-समावेशकता साधण्याचा प्रयत्न स्तुत्य आहे. उदा० इंग्रजी-मराठी शब्दकोशात 'Water' या इंग्रजी शब्दासाठी मराठीत 'उदक, पाणी, अंबू, आप, जल, तोय, नीर' असे बरेच प्रतिशब्द दिले आहेत. मात्र यातील कुठला पर्याय कुठल्या संदर्भात चपखल ठरतो यासंबंधी काहीही स्पष्टीकरण दिलेले नाही.

शब्दकोशांच्या पारंपरिक वैशिष्ट्यांना तंत्रज्ञानाची जोड दिल्यास त्यांचे उपयोजन-मूल्य किती व कसे वाढू शकते याची झलक या संकेतस्थळावर पाहावयास मिळते. यावरील सर्व शब्दकोश 'बोलके' आहेत. माहिती दृक् व श्राव्य अशा दोन्ही स्वरूपात मिळत असल्याने वापरकर्त्याला तिचे आकलन करणे सोपे जाते. विशेषत: शब्दांचे उच्चार तंतोतंत समजण्यासाठी ही सुविधा उपयोगी आहे. श्राव्य माहितीसाठी स्त्री व पुरुष असे दोघांचे आवाज वापरले आहेत. त्यामुळे माहितीला एक प्रकारची मनोवेधकता प्राप्त होते.

आज प्रचलित असलेल्या चार प्रमुख संपर्क-साधनांतून - संगणक, टॅब्लेट, मोबाईल (चलभाष) व वेब सर्व्हिस - हा शब्दकोश उपलब्ध आहे. खांडबहाले यांनीच म्हटल्या-प्रमाणे पुस्तक स्वरूपातील शब्दकोश हे त्यांचा आकार, पृष्ठसंख्या, वजन इत्यादीमुळे सुटसुटीतपणा व गतिमानतेची कास धरणाऱ्या सायबरयुगात तोकडे पडतात. त्याऐवजी सोईस्कर अशा टॅब्लेट किंवा मोबाइलकरिता शब्दकोश जास्त सुलभतेने वापरता येतात.

संकेतस्थळाच्या 'ऑन लाइन' व 'ऑफ लाइन' अशा दोन्ही सेवा उपलब्ध आहेत. 'ऑन लाइन' सेवा मोफत मिळू शकते. मात्र 'ऑफ लाइन' सेवेसाठी सी०डी० विकत घेऊन ती संगणकावर डाउनलोड करावी लागते. (सी०डी०च्या किमतीचा उल्लेख करणे आवश्यक आहे.) टॅब्लेट व मोबाइलवरही 'ऑन लाइन' शब्दकोश मिळू शकतो. मोबाइलवर ठरावीक क्रमांकावर एस०एम०एस० केल्यास भारतीय भाषेतील विशिष्ट शब्दांचे भाषांतर मिळण्याची सुविधा उपलब्ध आहे. प्रत्यक्षात ही सुविधा वापरून पाहिली असता हिंदी, मराठी, गुजराथी व तमीळ भाषेतील प्रतिशब्द मिळाले. पण ते त्या त्या भाषेच्या लिपीत असल्याने ती लिपी अवगत नसणाऱ्यांना ते समजू शकत नाहीत. (इथे युनिकोड किंवा रोमन लिपीचा उपयोग करणे उचित ठरेल.) तसेच मोबाईलवर ठरावीक फॉन्ट उपलब्ध असेल तरच भाषांतर दृश्यमान होते.

वापरकर्त्याच्या दृष्टीने एस०एम०एस० सुविधेत एक मोठा ठळक दोष दिसून येतो. शब्दाचे किंवा वाक्याचे भाषांतर चटकन दृष्टीच्या कक्षेत येईल, अशा रीतीने तेथे अवतरत नाही. प्रथम डोळ्यांसमोर येणारी जागा ही व्यापारी जाहिरातींनी व्यापलेली असते. ज्या भाषांतरासाठी ही सुविधा वापरायची ते भाषांतर मात्र बाजूला दिलेले आहे. त्यामुळे भाषांतरापेक्षा जाहिरातींना जास्त महत्त्व दिल्यासारखे वाटते.

संकेतस्थळावर अनेक भाषांचे टॅब्ज दिलेले आहेत. भाषांबद्दल सर्वसामान्य माहिती आहे; पण बऱ्याच भाषांतील शब्दकोश उपलब्ध नाहीत. अशा भाषांसाठीच्या लिंक्स 'डीलिंक' केल्यास बरे होईल. नाहीतर वापरकर्ता, नसलेल्या शब्दकोशांच्या शोधात वेळ विनाकारण घालवत राहतो. यातील शब्दचौकटींचा वापर प्रभावी वाटतो. शब्दचौकटीत शब्द टंकलिखित करून 'ट्रान्स्लेट'चे बटण दाबताच त्या शब्दाचे अर्थ युनिकोड व रोमन लिपीत दिसू लागतात. संकेतस्थळावर शब्दकोश कसा वापरायचा व तो संगणकावर किंवा मोबाईलवर कसा डाऊनलोड करायचा याची प्रात्यक्षिके दिली आहेत. त्यामुळे तंत्रज्ञान फारसे अवगत नसलेल्यांनाही तो आपल्या आवाक्यातील वाटतो. मात्र संकेतस्थळावरील लिखाणात व्याकरणाच्या व शुद्धलेखनाच्या काही चुकाही राहिल्या आहेत.

थोडक्यात 'खांडबहाले डॉट कॉम' हे अजूनही प्रारंभावस्थेत असलेले संकेतस्थळ आहे. या संकेतस्थळाची संकल्पना नक्कीच महत्त्वाकांक्षी आहे. वर उल्लेखिलेल्या उणिवा दूर केल्यास ते एक उपयुक्त संकेतस्थळ ठरू शकेल. भाषाशिक्षक व विद्यार्थी, भाषांतरकार, व्यावसायिक तसेच भाषाविषयात रस असणाऱ्या सर्वांसाठी ते उपयोगी ठरेल. दृक्-श्राव्य स्वरूपात असल्याने उपयोगकर्त्याची ऐकणे, बोलणे, वाचणे व लिहिणे ही चारही भाषाकौशल्ये विकसित करण्यास हा 'बोलका शब्दकोश' सहाय्यक ठरू शकेल. पूर्ण विकसित स्वरूपातील हे संकेतस्थळ राष्ट्रीय एकात्मतेच्या दिशेने टाकलेले एक महत्त्वाचे पाऊल ठरेल, अशी आपण आशा करू शकतो. ■

अनुवाद

# भारताची भाषासमृद्धी

कुमार आनंद
अनुवाद : हेमा क्षीरसागर

भारताचे पहिले भाषिक सर्वेक्षण इ० स० १८९८मध्ये जॉर्ज अब्राहम ग्रियरसन या आयरिश भाषावैज्ञानिकाने केले. तीन वर्षांनी त्याने अहवाल तयार केला. त्यात १७९ भाषा आणि स्वातंत्र्यपूर्व काळात भारतात बोलल्या जाणाऱ्या त्याहून जास्त बोलीभाषांची नोंद होती. त्यानंतर १०० वर्षांहून अधिक काळाने म्हणजेच २००५-२००६ साली- 'मानव संसाधन' विकास खात्याने (ह्यूमन रिसोर्स डेव्हल्पमेंट मिनिस्ट्री) 'भारत भाषा विकास योजना' या नावाचा असाच एक प्रयत्न केला; पण काही तांत्रिक कारणामुळे ती योजना बारगळली. २००७मध्ये शासनाने 'भारताचे नवीन भाषिक सर्वेक्षण' करण्याचे सूतोवाच केले; पण तोही प्रकल्प मुळात सुरूच झाला नाही.

२००९मध्ये बडोद्यातील 'भाषा संशोधन आणि प्रकाशन केंद्र' या संस्थेने हे काम हाती घेतले. साध्या सोप्या शब्दांत सांगायचे तर हे आजवरचे जगातील सर्वात मोठे भाषिक सर्वेक्षण आहे. या प्रकल्पाला चार वर्षांचा कालावधी लागला. त्यात ८५ संस्थांचा सहभाग होता. कितीतरी भाषावैज्ञानिक, समाजशास्त्रज्ञ, मानववंशशास्त्रज्ञ, सांस्कृतिक कार्यकर्ते आणि तीन हजाराहून अधिक स्वयंसेवक यांच्या निरलस आणि दीर्घ प्रयत्नांनी हा प्रकल्प पूर्ण झाला. त्यानंतर भाषाकेंद्राने आपले निष्कर्ष नोंदवले आणि २०१३ या वर्षी ते जाहीर केले. 'पीपल्स लिंग्विस्टिक सर्वे ऑफ इंडिया' (PLSI) यांच्या अहवालानुसार, भारताच्या पूर्वपश्चिम आणि दक्षिणोत्तर अशा सर्व भागांमध्ये मिळून आजमितीला ७८० भाषा बोलल्या जातात. मात्र २००१च्या जनगणनेनुसार फक्त १२२ भाषांची नोंद झालेली आहे.

दहा हजाराहून कमी लोक ज्या भाषा बोलतात, त्या भाषांची नोंद जनगणनेने केली नव्हती. या उलट भाषाकेंद्राने असा प्रयत्न केला की कितीही कमी लोक एखादी भाषा बोलत असोत त्या प्रत्येक भाषेची नोंद करायची. अशा नोंदलेल्या भाषांपैकी ४००पेक्षा अधिक भाषा आदिवासी आणि भटक्या, विमुक्त जमातींमध्ये बोलल्या जातात. हिंदी ही भाषा जर ४० कोटी लोक बोलतात, तर 'माझी' ही भाषा सिक्कीमच्या जोरथांग दरीत राहणारे फक्त चारच लोक बोलतात.

या प्रकल्पाच्या अहवालाचे ३५,००० पृष्ठांचे ६८ खंड तयार झाले असून ते ५

सप्टेंबर २०१३ या दिवशी राष्ट्राला अर्पण करण्यात येत आहेत. ५ सप्टेंबर हा भारताचे माजी राष्ट्रपती डॉ० सर्वपल्ली राधाकृष्णन् यांचा जन्मदिन असून तो 'शिक्षकदिन' म्हणून साजरा केला जातो.

''या ७८० भाषांपैकी सुमारे शहाण्णव टक्के-भाषांची कधीच, कुठेच नोंद झाली नव्हती. भारतातील प्रजासत्ताक राज्यपद्धतीचे मंदिर असलेल्या संसदेतही ही नोंद झाली नाही,'' असे या प्रकल्पाचे मुख्य सूत्रधार श्री० गणेश देवी सांगतात. ते पुढे म्हणतात, ''आम्हांला भाषांचे स्मशान उकरून काढायचे नाही, तर भारतात असणाऱ्या लहानात लहान बोलीभाषांचा कौतुकसमारंभ साजरा करायचा आहे. या भाषा लोकांनी घडवल्या आणि शब्द, गोष्टी, गाणी या माध्यमांतून टिकवल्या. त्या शोधून काढायचा प्रयत्न केला आणि त्यांची नोंद केली.''

मानव संसाधन विकास खाते यांनी नॉनशेड्यूल्ड (दुर्लक्षित) भाषांच्या संदर्भात एक समिती नेमली. त्यांच्या विचारमंथनातून 'भारत भाषा विकास योजना' निर्माण झाली. डॉ० गणेश देवी हे त्या समितीचे अध्यक्ष होते. महाराजा सयाजीराव विद्यापीठात ते इंग्रजी वाङ्मयाचे प्राध्यापक होते. पण भाषा संशोधन केंद्र स्थापन करण्याच्या हेतूने त्यांनी आपली नोकरी सोडली. बडोद्यातील तेजगड या आदिवासी भागात १९९६मध्ये त्यांनी हे केंद्र स्थापन केले. नोंद न झालेल्या दुर्लक्षित भाषा जतन करणे, त्यांचा विकास करणे आणि आदिवासी जमातींना व भटक्या जमातींना सक्षम बनवणे; हे या संस्थेचे उद्दिष्ट होते.

एखादी भाषा आणि ती बोलणारे आदिवासी लोक यांच्याजवळ पोहोचण्याचा सोपा खात्रीशीर मार्ग ठरवणे, हा भाषिक सर्वेक्षणाचा एक भाग होता. त्यासाठी त्या त्या प्रदेशातील किंवा जमातीतील लोक तयार केले. त्या स्वयंसेवकांना सांगितले की, नुसता भाषेचा मागोवा घेऊ नका, तर त्या भाषेचा उत्क्रांतीचा कालावधी आणि ती भाषा त्या संस्कृतीत टिकली कशी - उदा० गाणी, गोष्टी, धर्मकृत्ये (रिच्युअल्स), वात्सल्यदर्शक शब्द, नाती, रंगांची नावे, वारांची नावे, दैनंदिन जीवनातील शब्द या साऱ्या पैलूंचा मागोवा घ्या.

गणेश देवी सांगतात, ''हे सर्वेक्षण शासकीय सर्वेक्षणापेक्षा आगळेवेगळे होते, त्यात विविध जाती-जमातींतील लोकांचा सहभाग होता, हे सूचित करण्यासाठी आम्ही या सर्वेक्षणाला 'लोकांचे सर्वेक्षण' (People's Survey) असे नाव दिले.''

या सर्वेक्षणाला शासनाचे आर्थिक साहाय्य नव्हते आणि खर्चाचा अंदाज सुमारे एक कोटी रुपये एवढा होता. या सर्वेक्षणाच्या प्रत्यक्ष कामाला चार वर्षे लागली, हे खरे; पण त्या कामाचा संपूर्ण आराखडा तयार करायला दहाहून जास्त वर्षे लागली. कारण अशा प्रकारचे, एवढ्या मोठ्या प्रमाणावरचे सर्वेक्षण यापूर्वी भारतात झाले नव्हते,

त्यामुळे डोळ्यासमोर आदर्श नमुना नव्हता किंवा काही आधार नव्हता.''

सर्वेक्षण करणाऱ्या लोकांनी त्या त्या जमातींत भेटी दिल्या, त्यांची वैशिष्ट्ये समजून घेण्यासाठी त्यांच्याबरोबर काम केले, आणि त्या लोकांमधूनही काही स्वयंसेवक तयार केले. त्यासाठी औपचारिक आणि अनौपचारिक भेटीगाठीही घेतल्या. बऱ्याच वर्षांच्या या प्रक्रियेनंतर देशाच्या प्रत्येक भागासाठी स्वयंसेवकांचे एक जाळे तयार झाले. त्यानंतर त्या स्वयंसेवकांना आपापल्या भागातील लोकांसाठी प्रश्नावली तयार करण्याचे विशेष (खास) प्रशिक्षण देण्यात आले. या प्रश्नावली म्हणजे भाषावैज्ञानिकांच्या शब्दांत सांगायचे तर आत्मपरिचय देणाऱ्या होत्या.

विविध भाषांच्या प्रतिनिधींच्या अनेक सभा २०१०मध्ये झाल्या आणि नंतर पुढे २०१२मध्येही झाल्या, आणि त्यांना त्यांची त्यांची कामे देण्यात आली. जानेवारी २०१२मध्ये बडोदा येथे झालेल्या सभेत जगाच्या वेगवेगळ्या भागांतून आलेल्या जवळजवळ नऊशेहून अधिक भाषांच्या प्रतिनिधींचा सहभाग होता. समुद्रापारच्या प्रतिनिधींचाही यात समावेश होता. प्रकल्पात काम करणाऱ्या भाषाकोविदांना त्यांचे वाङ्मय, संस्कृती आणि त्यांच्या भाषांच्या जवळपासच्या बोलीभाषा यांची माहिती व्हावी, त्यांच्यामधील आंतरक्रियांमधून सर्वेक्षणासाठी एक भाषिक बैठक तयार व्हावी, हा त्यामागचा हेतू होता. सर्वेक्षकांनी आपापले सुरुवातीचे काम सुरू केले तेव्हा त्यांना आश्चर्याचे एकेक धक्के बसायला लागले. त्यातला पहिला धक्का म्हणजे 'अरुणाचल'सारख्या एका चिमुकल्या प्रदेशात सर्वात जास्त, म्हणजे नव्वद भाषा बोलल्या जातात, याउलट गोव्यात मात्र फक्त तीन भाषा बोलल्या जातात. पंजाब आणि हरियाणामध्ये मिळून फक्त सात भाषा बोलल्या जातात, उलट गुजरात, महाराष्ट्र आणि आसाममध्ये पन्नासहून अधिक भाषा बोलल्या जातात.

भाषासर्वेक्षणाने यापूर्वी कधीही दादरा-हवेलीमध्ये बोलल्या जाणाऱ्या 'गोरपा' या भाषेची नोंद केली नव्हती. ही भाषा म्हणजे किनारपट्टीवर शेती करणाऱ्या चैतन्यपूर्ण संस्कृती असलेल्या मच्छिमारांच्या एका जमातीची प्रातिनिधिक भाषा आहे. या 'गोरपा' भाषेबद्दल योग्य माहिती देणारी व्यक्ती त्या जमातीतून शोधून काढणे हे महाकठीण काम होते. कारण नवी पिढी गुजराथी बोलत होती. त्यांना त्यांच्या मूळ भाषेबद्दल काहीच माहिती नव्हती. जुन्या पिढीतील वयस्कर मंडळींकडून मात्र या भाषेबद्दल खूप माहिती मिळाली. पण त्यांना गुजराथी भाषा येत नव्हती; असे कांती महाले या स्वयंसेवकाने सांगितले. त्यांच्यासारख्या स्वयंसेवकांनी प्रत्येक भाषेसाठी एकेक महिना काम केले.

सिक्कीममधील भाषासमूहशास्त्रावर काम करणाऱ्या बाळाराम पांडे यांनी सांगितले की राज्यात ज्यांची नोंद झालेली आहे अशा पंधरा भाषांपैकी किमान तीन भाषा-फुजेल, माझी आणि थाणी (Thani) - या बोलल्या जात होत्या, असा उल्लेख कधीच झालेला

नाही. आज हयात असलेल्या फारच थोड्या लोकांना या भाषा माहीत आहेत.

''मूठभर लोक बोलत असलेली 'माझी' ही भाषा त्यांच्या लोकवारशातून टिकून आहे. नवी पिढी आता हिंदी, इंग्रजी किंवा नेपाळी या भाषा बोलते. राज्यशासनाच्या मानववंशशास्त्रीय नोंदींमधून या भाषेचा मागोवा घ्यावा लागला. आणि जी भाषा कधीच अस्तित्वात नव्हती, त्या भाषेची उच्चारशास्त्रीय (Phonetic) रचना शोधण्याचाही आम्ही प्रयत्न केला,'' असे पांडे म्हणाले.

डॉ० विभा भारती या गोहाटी विद्यापीठात असमिया शिकवतात. त्यांनी त्यांच्या पंच्याहत्तर सहकाऱ्यांच्या मदतीने आसामसाठी एक खंड तयार केला. त्यात पंचावन्न भाषांची नोंद आहे. अफगाणिस्तानच्या सीमेवरील पाकिस्तानच्या 'गिलगिद-बाल्तीस्तान' या प्रदेशातून घुसखोरांनी आणलेली 'बुरुशस्की' ही भाषा काश्मीरमधील फारतर तीनशे लोक बोलतात. मैसूरच्या सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजेस (CIIL)चे माजी संचालक भाषावैज्ञानिक ओंकार कौल यांचे हे मत आहे. आपल्या पंधरा सहकाऱ्यांबरोबर त्यांनी जम्मू-काश्मीरसाठी खंड बनविण्याचे काम केले आहे. ''बुरुशस्की भाषा बोलणाऱ्या जमातींनी सुमारे एकशेपंचवीस वर्षांपूर्वी येथे वस्ती केली. पण त्यांची भाषा आणि संस्कृती यांचे त्यांनी जतन केले आहे.'' असे ओंकार कौल यांचे म्हणणे आहे.

महाराष्ट्रासाठीचा सर्वेक्षणाचा खंड श्री० अरुण जाखडे आणि त्यांचे सत्तर सहकारी यांनी सिद्ध केला. अरुण जाखडे म्हणतात, ''राज्यशासनाच्या दप्तरात साठ भाषांची नोंद असून त्यांपैकी कित्येक भाषा नष्टप्राय होण्याच्या मार्गावर आहेत. 'मेहली' ही भाषा बुलढाणा जिल्ह्यात फारतर एकशेतीस लोक बोलतात, आणि 'नोलिंग' ही भाषातर फक्त एका लहानशा खेड्यात बोलली जाते.'' जाखडे पुढे म्हणाले, ''कितीतरी भाषा नष्ट होण्याच्या मार्गावर आहेत. याचे कारण म्हणजे त्या त्या समाजातील व्यक्तींना आपल्या मूळ भाषांबद्दल सांस्कृतिक आणि सामाजिक आदर उरलेला नाही. त्यांच्यापैकी बहुतांश लोक मुख्य प्रवाहात असलेली भाषाच वापरतात.''

डॉ० शेखर पाठक आणि डॉ० उषा पाठक या दोघा पर्यावरणवादी व्यक्तींनी तीस सहकाऱ्यांच्या मदतीने उत्तराखंडासाठीचा खंड सिद्ध केला.

हे सर्वेक्षण करताना अशाही काही जमाती आढळल्या की ज्यांची भाषा नष्ट झाली आहे, तरीही ते लोक नृत्य आणि इतर लोकपरंपरांच्या माध्यमातून त्यांची संस्कृती जपण्याचा, टिकवून ठेवण्याचा प्रयत्न करताहेत. प्रसिद्ध साहित्यिक कानजी पटेल यांनी गुजरातसाठीचा भाषिक सर्वेक्षणाचा खंड सिद्ध केला. त्यांनी सिद्दी जमातीचे उदाहरण दिले आहे, हे लोक दक्षिणपूर्व आफ्रिकेतून स्थलांतर करून भारतात आले आणि भारताच्या वेगवेगळ्या भागात स्थिरावले. यात गुजरात आणि महाराष्ट्र या प्रदेशांतील किनारपट्टीचा भागही येतो. ''त्यांची नृत्यकला, संगीत-वाद्ये सुरक्षित आहेत; पण भाषा मात्र लुप्त

झाली,'' असे श्री० पटेल सांगतात.

नाईक (Naika) नावाची एक भटकी जमात आहे. हे लोक पंचमहालस जिल्ह्यात, आदिवासींचे वर्चस्व असलेल्या लुनावडा तालुक्यातील एका जंगलात राहतात. त्यांच्या भाषेचे अगदी अस्पष्ट असे अवशेष त्यांनी आजवर कसेबसे तगवून ठेवले आहेत. ''त्यांच्या भाषेविषयी त्यांना काहीही कल्पना नाही.'' असेही पटेल म्हणतात. पण असे का झाले असावे याची कारणे शोधताना ते म्हणतात, ''त्यांना त्यांचे असे जंगल नाही, कसायला जमीन नाही किंवा काही व्यवसाय नाही; कारण त्यांची नोंद 'ओबीसी' म्हणून केली जाते. ते इतरांशी स्पर्धाही करू शकत नाहीत.''

गुजरातच्या उत्तर, मध्य आणि दक्षिण या भागात राहणारी, आपली भाषा हरवणारी नाईक ही एकच जमात नाही, तर अशा आणखीही कितीतरी जमाती आहेत. गुजरातमध्ये अशा किमान त्रेपन्न तरी बोलीभाषा आहेत, ज्यांची इतर भाषांच्या दबावामुळे वाढ झालेली नाही. दुसरीकडे गुजरातमधील कच्छ आणि सौराष्ट्र यांच्या किनारपट्टीवर राहणारी एक चैतन्यपूर्ण अशी कोळी जमात आहे. त्यांनी आपली भाषा जतन करून ठेवली आहे. 'गुजरातमधील या जमातीतले सुमारे तीस हजार लोक तरी ही कोळी भाषा बोलतात' असे त्यांना आढळले.

आपले मूळ अस्तित्व (खरी ओळख) उघड होऊ नये, इतरांना कळू नये म्हणून काही जमातींनी आपली भाषा नाकारल्याचीही उदाहरणे सर्वेक्षणात आढळली. यांत मुख्यत: ज्यांच्या कपाळावर ब्रिटिश शासनाने गुन्हेगारीचा शिक्का मारला होता आणि आजही ज्यांना तसेच मानले जाते, अशा जमाती आहेत. ''आपली भाषा आपली खरी ओळख उघड करील अशी त्यांना भीती वाटते. त्यामुळे पोलिसांचा ससेमिरा आपल्यामागे लागेल असे त्यांना वाटते.'' असे पटेल म्हणतात. बाह्य गोष्टींच्या दबावामुळे त्यांचे काम जास्त महत्त्वाचे ठरू शकले नाही. जसजसा विकास होत जातो, तसतशी आपली मूळ भाषा टाकून मुख्य प्रवाहातली भाषा आत्मसात करावी असे लोकांना वाटते. त्यांचा भाषिक वारसा जरी तुटपुंजा असला तरी त्यांना त्यातून आपल्यातील सुप्त क्षमता समजतील स्वत:चा दर्जा मिळवता येईल.

''या भाषा बोलणाऱ्या लोकांना 'प्रभाव गाजवणाऱ्या (=मुख्य) भाषेचा धसका वाटतो. पण लोकांना त्यांची मूळ भाषा मिळवून दिली तर त्यांचे सामर्थ्य वाढेल,'' असे पटेल यांना वाटते. ■

संदर्भ : 'द इंडियन एक्स्प्रेस'च्या दि० ११ ऑगस्ट २०१३च्या रविवार पुरवणीतील कुमार आनंद यांच्या 'इंडिया स्पीक्स.. 780 वेज..' या मूळ लेखाचा अनुवाद.

# वऱ्हाडी व नागपुरी : व्याकरण-प्रक्रिया

रावसाहेब काळे

'वऱ्हाडी व नागपुरी : स्वनप्रक्रिया' ('भाषा आणि जीवन', उन्हाळा २०१३) या लेखात वऱ्हाडी आणि नागपुरी बोलीचे स्वन पातळीवर साम्यभेद पाहिले. आता या लेखात वऱ्हाडी आणि नागपुरीचे व्याकरणिक साम्यभेद लक्षात घेऊ या.

**वचन**

(१) प्रमाण मराठीतील 'अ'-कारान्त पुल्लिंगी नामांचे अनेकवचन वऱ्हाडी व नागपुरीत शब्दान्ती येणाऱ्या 'अ'काराचा दीर्घ उच्चार करून केले जाते.

| | (प्र०-प्रमाण मराठी) | (व०-वऱ्हाडी बोली) | (ना०-नागपुरी बोली) |
|---|---|---|---|
| (ए०व०) | केस | ऊकेस् | ऊकेस् |
| (अ०व०) | केस | ऊकेसं | ऊकेसं |
| (ए०व०) | पापड | ऊपापळ् | ऊपापड् |
| (अ०व०) | पापड | ऊपापळं | ऊपापडं |

दीर्घ 'अ'कारान्त पुल्लिंगी नामाचे अनेकवचन दोन्ही बोलींत शब्दान्ती येणाऱ्या 'अ'काराचा अतिदीर्घ उच्चार करून केले जाते. उदा० (दीर्घ) दोस्तं-(अतिदीर्घ) दोस्तंऽऽ.

(२) 'आ'कारान्त पुल्लिंगी नामाचे अनेकवचन दोन्ही बोलींत प्रमाण मराठीप्रमाणे 'ए'-कारान्त होते : (ए०व०) घोडा ऊघोळा ऊघोडा,(अ०व०) घोडे ऊघोळे ऊघोडे.

(३) प्रमाण मराठीत काही पुल्लिंगी व स्त्रीलिंगी नामाचे अनेकवचन होत नाही. तेथेही दोन्ही बोलींत अनेकवचन होताना आढळते.

पुल्लिंगी : (ए०व०) सल्ला ऊसल्ला ऊसल्ला, (अ०व०) (सल्ला) ऊसल्ले ऊसल्ले,

स्त्रीलिंगी : (ए०व०) गती ऊगती ऊगती, भूक ऊभूक् ऊभूक्, लाज ऊलाज् ऊलाज्

(अ०व०) (गती) ऊगत्या, ऊगत्या, (भूक) ऊभुका ऊभुका,

(लाज) ऊलाजा ऊलाजा,

(ए०व०) शरम ऊशरम् ऊशरम्, सासू ऊसासू ऊसासू,

(अ०व०) (शरम) ऊशर्‌मा ऊशर्‌मा, (सास) ऊसासा ऊसासा

(४) 'अ'-कारान्त पुल्लिंगी नामाप्रमाणे दोन्ही बोलींत 'अ', 'ऊ'-कारान्त नपुंसकलिंगी नामांचे अनेकवचन शब्दान्ती येणाऱ्या 'अ'-काराचा दीर्घ उच्चार करून केले जाते.

'अ'-कारान्त

(ए०व०) झाड ऊझाळ् ऊझाड्, पान ऊपान् ऊपान्, फूल ऊफूल् ऊफूल्,

(अ०व०) झाडे ऊझाळं ऊझाडं, पाने ऊपानं ऊपानं, फुले ऊफुलं ऊफुलं.

'ऊ'-कारान्त

(ए०व०) पाखरू ऊपाख्रू ऊपाख्रू, वासरू ऊवास्रू ऊवास्रू,

(अ०व०) पाखरे ऊपाख्रं ऊपाख्रं, वासरे ऊवास्रं ऊवास्रं.

(५) प्रमाण मराठीतील काही 'ए'-कारान्त नामे दोन्ही बोलींत 'अ'-कारान्त उच्चारली जात असून त्या नामांचे अनेकवचनी रूप 'ए'-कारान्त होते.

(ए०व०) कुत्रे ऊकुत्रं ऊकुत्रं, भांडे ऊभांडं ऊभांडं, मडके ऊमळ्कं ऊमड्कं,

(अ०व०) कुत्री ऊकुत्रे ऊकुत्रे, भांडी ऊभांडे ऊभांडे, मडकी ऊमळ्के ऊ मड्के.

**लिंग**

(१) लिंगाबाबत वऱ्हाडी ही प्रमाण मराठीला अनुसरते तर नागपुरी थोडा भेद दर्शविते. खालील उदाहरणांत प्रमाण मराठीतील स्त्रीलिंगी शब्द नागपुरीत पुल्लिंगी, तर नपुंसकलिंगी शब्द पुल्लिंगी व नपुंसकलिंगी अशा दोन्ही रूपांत आढळतात.

(हकीकत/गोष्ट) ऊकिस्सा (पु०) ऊखिसा (स्त्री०),

जागृती (स्त्री०) ऊजाग् (स्त्री०) ऊजाग् (पु०),

फट (स्त्री०) ऊफट् (स्त्री०) ऊफट्या (पु०),

गाव (न०) ऊगाव् (न०) ऊगाव् (पु०/न०),

नाव (न०) ऊनाव् (न०) ऊनाव् (पु०/न०).

**विभक्ती**

| विभक्ती | प्रमाण मराठी | | वऱ्हाडी | | नागपुरी | |
|---|---|---|---|---|---|---|
| | एव० | अ०व० | ए०व० | अ०व० | ए०व० | अ०व० |
| प्रथमा | बैल | बैल | बईल् | बईलं | बईल् | बय्लं |
| द्वितीया | बैलास | बैलांना | बय्लाले | बईलाईले | बय्लास्/ले | बय्लाईस्/य्ले/इले |
| तृतीया | बैलाने | बैलांनी | बय्लानं | बईलाईनं | बय्लानं | बय्लाय्नं/इनं |
| चतुर्थी | बैलास/ला | बैलांना | बय्लाले | बईलाईले | बय्लास्/ले | बय्लाईस्/य्ले/इले |
| पंचमी | बैलाहून | बैलांहून | बय्लाहून | बईलाईहून | बय्लाऊन्/हून् | बय्लायहून् |
| षष्ठी | बैलाचा/ची/चे | बैलांचे/ची/चे, | बय्लाचा/ची/चं, | बईलाईचा | बय्लाचा/ची/चं | बय्लाय्चे/च्या/चे |
| सप्तमी | बैलात | बैलांत | बय्लात् | बईलईत | बय्लात् | बय्लाइत् |

(१) द्वितीया आणि चतुर्थीचा 'ला' प्रत्यय दोन्ही बोलींत 'ले' उच्चारात आढळतो. मात्र, नागपुरीत शिष्टजनांच्या तोंडी 'ले' हा प्रत्यय आढळत नसून 'स', 'ज' या प्रत्ययाचा उपयोग करतात. वऱ्हाडीत 'स', 'ज' हे प्रत्यय सुशिक्षित वा अशिक्षितांच्या उच्चारात आढळत नाहीत.

मला ऊमले ऊमऽज तुला ऊतुले ऊतूज, त्याला ऊत्याले ऊत्याज,
आम्हाला ऊआमाले ऊआम्हास्, तुम्हाला ऊतुमाले ऊतुम्हास्,
त्यांना ऊत्याईले ऊत्याहीस्,
लोकांना ऊलोकाईले ऊलोकाहीस्, कुत्र्यांना ऊकुत्र्याईले ऊकुत्र्यास्.

(२) प्रमाण मराठीतील तृतीयेचा 'ए' प्रत्यय दोन्ही बोलींत दीर्घ 'अ' होतो.

(३) प्रमाण मराठीत प्रथम व द्वितीय पुरुषी एकवचनी सर्वनामांना तृतीयेचा 'आ', 'नं' प्रत्यय लागत नाही. तो दोन्ही बोलींत तो लागताना आढळतो.

मी ऊम्या ऊम्या तू ऊत्वा ऊत्वा, तू ऊत्या ऊत्या,
मी ऊमिनं ऊमिनंतू ऊतुनं ऊतुनं, तू ऊतुया ऊत्या.

तसेच, प्रमाण मराठीप्रमाणे 'मी', 'तू' ही अप्रत्ययी तृतीयेची रूपे वऱ्हाडीत आढळतात, मात्र नागपुरीत ती आढळत नाहीत. 'तुया' हेही रूप नागपुरीत नाही.

(४) षष्ठी विभक्तीचे प्रथम व द्वितीय पुरुषी सर्वनामांना लागणारे प्रत्यय (प्रमाण मराठी 'झा', 'झी', 'झे',) नागपुरीत 'हा', 'ही', 'हे' तर वऱ्हाडीत 'या', 'ई', 'यं' असे आढळतात.

उदा० माझा ऊमाया ऊमाहा, माझी ऊमाई ऊमाही,
माझे ऊमायं ऊमाहे, तुझा ऊतुया ऊतुहा,
तुझी ऊतूई ऊतुही, तुझे ऊतुहे ऊतुयं.

(५) प्रमाण मराठीत संबोधनाचे एकवचनी प्रत्यय बहुधा आढळत नाहीत. वऱ्हाडी व नागपुरीत 'आ', 'या' पुल्लिंगी, 'आ', 'ए' स्त्रीलिंगी, 'आ', 'या' नपुंसकलिंगी असे प्रत्यय लागतात.

राम (पु०) ऊरामा/ राम्या ऊरामा/राम्या,
सदू ऊसदू/ सद्या ऊसदू/सद्या.
कमल (स्त्री०) ऊकम्ला/ कम्ले ऊकम्ला/कम्ले,
बबी ऊबबे ऊबबे.
पोर (न०) ऊपोरा/(पोट्ट्या) ऊपोरा/ पोऱ्या.

प्रमाण मराठीतील संबोधनाचा अनेकवचनी 'नो' प्रत्यय वऱ्हाडीत व नागपुरीत आढळत नाही. वऱ्हाडीत 'हो' तर नागपुरीत 'व्हा' हे संबोधन आढळते.

| | | | |
|---|---|---|---|
| लोक (पु०) | लोकांनो/लोक हो | लाकं हो | लोकं व्हा, |
| बाई (स्त्री०) | बायांनो | बायाई हो | बाया व्हा, |
| पोरे (न०) | पोरांनो | पोरं हो | पोरं व्हा. |

(८) प्रमाण मराठीत अनेकत्वदर्शक अनुस्वार जेथे येतो तेथे वऱ्हाडीत 'ई' तर नागपुरीत 'य्' येतो.

बैलाने (ए०व०) ऊबइलानं ऊबय्लानं

बैलांनी (अ०व०) ऊबैलाईनं ऊबय्लायूनं.

**सामान्यरूप :**

(१) दोन्ही बोलींत 'अ', 'आ', 'ई', 'ऊ', 'ओ'-कारांत पुल्लिंगी शब्दांना सामान्यरूपाचा अनुक्रमे 'आ', 'या', 'या', 'आ', 'या' प्रत्यय लागतो.

'अ'-कारान्त : (व०) बईल् (बैल) - बइलाले - बइलानं - बइलाचा - बइलात् - बइलाखाल्तं/खाली.

(ना०) बरड् (डोंगर) - बड्डाले - बड्डानं - बड्डाचा - बड्डात् - बड्डाखाल्तं.

'आ'-कारान्त : घोळा ऊघोडा

(व०) घोळा - घोळ्याले - घोळ्यानं - घोळ्याऊन - घोळ्याचा - घोळ्यात्.

(ना०) घोडा - घोड्याले - घोड्यानं - घोड्याऊन् - घोड्याचा - घोड्यात्.

'ई'-कारान्त : शिपी (शिंपी)

(व०) शिपी - शिप्याले - शिप्याचा - शिप्यावानी - शिप्यासार्का/वानी.

(ना०) शिपी - शिप्याले - शिप्याचा - शिप्यावानी - शिप्यासार्का.

'ऊ'-कारान्त : इचू (विंचू)

(व०) इचू - इच्वाले - इचावानं - इच्वाऊन् - इच्वाचा - इच्वात्.

(ना०) इचू - इच्वाले - इच्वानं - इच्वाऊन् - इच्वाचा - इच्वान्.

'ओ'-कारान्त : इस्तो (विस्तू)

(व०) इस्तो - इस्त्याले - इस्त्यानं - इस्त्याजोळ् - इस्त्याहून्.

(ना०) इस्तो - इस्त्याले - इस्त्यानं - इस्त्याशीन् - इस्त्याऊन्.

प्रमाण मराठीत क्वचित सामान्यरूप न होता विभक्तिप्रत्यय लागतात. वऱ्हाडीत 'हत्ती'सारख्या शब्दाला विभक्तिप्रत्यय लागताना एकवचनात सामान्यरूपाच्या बाबत अनिश्चितता आढळते, तर अनेकवचनात नियमित सामान्यरूप होते. नागपुरीत एकवचनात व अनेकवचनात प्रत्यय लागण्यापूर्वी सामान्यरूप होते.

(प्र०) हत्ती - हत्तीला - हत्तीने - हत्तीहून - हत्तीचा

(व०) हत्ती - हत्तीले - हत्तीनं - हत्तीहून - हत्तीचा





अनुक्रमणिका

हत्ती - हत्याले - हत्यानं - हत्याहून - हत्याचा

(ना०) हत्ती - हत्याले - हत्यानं - हत्याऊन - हत्याचा

(अ०वा०) हत्तींना - हत्तींनी, हत्याईले - हत्याईनं, हत्यायले - हत्याईनं, हत्त्यायूले - हत्त्यायूनं.

(२) 'अ', 'आ', 'ई', 'ऊ'-कारान्त स्त्रीलिंगी नामांना सामान्यरूपाचा अनुक्रमे वऱ्हाडीत 'इ', 'ई/०', '०', '०' तर नागपुरीत 'अऽ/ई', 'ई/०', '०', 'व/अऽ' प्रत्यय लागतो.

'अ'-कारान्त : ईट् (वीट), भीत् (भिंत)

(व०) ईट-इटीले-इटीनं-इटीवर-इटीचा, भीत्-भितीले-भितीनं-भितीवर्.

(ना०) ईट्-इट्ऽले-इटऽनं-इटऽवर्-इटऽचा, भीत्-भितीले-भितीनं-भितीवर्-भितीचा.

'आ'-कारान्त :

(व०) कमला-कम्लीले-कम्लीनं-कम्लीसाठी,
अन्पुर्ना-अन्पुर्नानं/र्नीनं- अनपुर्नासंग/र्नीसंग.

(ना०) कमला-कम्लीले-कम्लीनं-कम्लीसाटी,
अन्पुर्ना-अन्पुर्नानं-अनपुर्नासंग.

नागपुरीप्रमाणे 'जागा' ह्या स्त्रीलिंगी नामाच्या सामान्यरूपात येणारा 'ई' प्रत्यय वऱ्हाडीत येत नाही. अन्य शब्दांत येतो. जाग्यावर (व०) - जागीवर् (न०)

'ई'-कारान्त :

(व०) बाई-बाईले-बाईनं-बाईमांगं-बाईजोळ्.

(ना०) बाई-बाईले-बाईनं-बाईमांगं-बाईजवर्.

'ऊ'-कारान्त :

(व० ) जाऊ-जाऊले-जाऊनं-जाऊचा-जाऊसंगं-जावयनं

(ना०) जाऊ-जावऽले-जाऊनं/जावऽनं-जावऽचा-जावऽसंगं-जावायनं

(व० ) सासू-सासूले-सासूनं-सासूऊन्-सासूसंग-सासायूनं/सासवायूनं

(ना०) सासू-सासूले-सासूनं-सासूहून्-सासूसंग-सासायूनं.

(३) 'अ', 'ई', 'ऊ', 'अऽ'-कारान्त नपुंसकलिंगी नामाचे सामान्यरूप होताना दोन्ही बोलींत अनुक्रमे 'आ', 'या', 'आ', 'या', प्रत्यय लागतात.

'अ'-कारान्त :

(व० ) घर्-घराले-घराऊन्-घराचं-घरामांगं-घरावानी.

(ना०) घर्-घराले-घराऊन्-घराचं-घरामांगं-घरावानी.

'ई'-कारान्त :

(व० ) लोनी-लोन्याले-लोन्याऊन्-लोन्यासार्कं-लोन्यासंगं

(ना०) लोनी-लोन्याले-लोन्याऊन्-लोन्यासार्कं-लोन्यासंगं.

'ऊ'-कारान्त :

(व० ) वासूरू-वासूराले-वासूराऊन्-वासूराचा-वासूरामांगं.

(ना०) वासूरु-वासूराले-वासूराऊन्-वासूराचा-वासूरामांगं.

'अऽ'-कारान्त :

कुत्रं-कुत्र्याले-कुत्र्याचा-कुत्र्यावानी-कुत्र्यासंगं.

दोन्ही बोलींत क्वचित नामाला सामान्यरूपावाचून प्रत्यय लागतात.

उदा० गावूले - गावूचा - गावूची.

**सर्वनाम**

| | प्रमाण मराठी | | वऱ्हाडी | | नागपुरी | |
|---|---|---|---|---|---|---|
| | ए०व० | अ०व० | ए०व० | अ०व० | ए०व० | अ०व० |
| प्रथम पुरुष | मी | आम्ही | मी | आमी | मी | आम्ही, हामी |
| द्वितीय पुरुष | तू | तुम्ही | तू | तुमी | तू | तुम्ही, तुमी |
| तृतीय पुरुष | तो (पु०) | ते | तो | ते | थो | थे |
| | ती (स्त्री०) | त्या | ती | त्या | थे | थ्या |
| | ते (न०) | ती | ते | ते | थे | थे |
| आत्मवाचक | स्वत:,आपण | स्वत:,आपण | सोता,आफून् | खुद्, सोता | | सोता,आफून्,खुद |
| दर्शक | हा (पु०) | हे | हा | हे | ह्या | हे, ह्ये |
| | ही (स्त्री०) | ह्या | ही | ह्या | हे, ह्ये | ह्या |
| | हे (न०) | ही | हे | हे | हे, ह्या | हे, ह्ये |
| संबंधी | जो (पु०) | जो | जो | जे | जो | जे |
| | जी (स्त्री०) | ज्या | जी | ज्या | जे | ज्या |
| | जे (न०) | जी | जे | जे | जे | जे |
| प्रश्नार्थक | कोण | कोण | कोन | कोन | कोन | कोन |
| | का | का | का | का | का | का |
| निश्चित | | कोन, का | | कोन, का | | कोन, का |





अनुक्रमणिका

(१) प्रमाण मराठीत येणाऱ्या 'आम्ही' ह्या प्रथमपुरुषी अनेकवचनी सर्वनामासाठी वऱ्हाडीमध्ये 'आमी' तर नागपुरीत 'आम्ही', 'हामी' सर्वनामे येतात. तसेच, वऱ्हाडातील अमरावतीकडे नागपुरीप्रमाणे तृतीय पुरुषी सर्वनामे 'थो','थी','थे' अशी उच्चारली जातात.

(२) प्रथमपुरुषी आणि द्वितीयपुरुषी सर्वनामे सोडल्यास अन्य तृतीय पुरुष, दर्शक, संबंधी सर्वनामे तिन्ही लिंगांसाठी स्वतंत्र रूपाने येतात. वऱ्हाडीत अनेकवचनात पुल्लिंगी व नपुंसकलिंगी सर्वनामे एकसारखी आहेत. तर, नागपुरीत एकवचनात स्त्रीलिंगी व नपुंसकलिंगी सर्वनामे एकसारखी असून अनेकवचनात पुल्लिंगी व नपुंसकलिंगी सर्वनामे एकसारखी आहेत.

**विशेषणे :**

(१) प्रमाण मराठीप्रमाणे वऱ्हाडीत सार्वनामिक विशेषणे 'का' प्रत्ययान्त असतात तर नागपुरीत ती 'ला' प्रत्ययान्त आढळतात.

उदा० इतका ऊइत्का ऊइत्का, कितका ऊकित्का ऊकित्का,
जितका ऊजित्का ऊजित्ला तितका ऊतित्का ऊतित्ला,

(२) संख्या विशेषणान्ती येणाऱ्या 'न्न'चा दोन्ही बोलीत 'न' होतो.

उदा० एकावन्न ऊयेकावन् ऊयेक्कावन्, बावन्न ऊबावन् ऊबावन्
चौपन्न ऊचउपन् ऊचउपन्/उव्पन्, पंचावन्न ऊपंचावन् ऊपंचावन्
सत्तावन्न ऊसत्तावन् ऊसत्तावन्, अठ्ठावन्न ऊअठ्ठावन् ऊअठ्ठावन्.

(३) संख्याविशेषणान्ती येणाऱ्या संयुक्त वर्णातील आद्यस्थानी येणाऱ्या 'ष्'चा दोन्ही बोलीत लोप होतो.

उदा० एकसष्ट ऊयेक्सट् ऊयेक्सट्, बासष्ट ऊबासट् ऊबासट्,
चौसष्ट ऊचउसट् ऊचव्सट्, पासष्ट ऊपासट् ऊपासट्,
सहासष्ट ऊसासट् ऊसहासट्, सदुसष्ट ऊसदुसट् ऊसडुसट्/सटुसट्.

(४) 'चाळीस' हा शब्द सामासिक शब्दात उत्तरपद म्हणून येतो तेव्हा नागपुरीत 'च'चा 'त' होतो.

उदा० एकोणचाळीस, ऊयकोन्चाळीस्, ऊयेकान्तालीस/ येकोन्चारीस,
एकेचाळीस, ऊयकेचाळीस् ऊयेक्तालीस्/येकोन्चारीस्/येक्चार्,
बेचाळीस, ऊबेचाळीस् ऊबेतालीस्/ बेचार्/बेचारीस्,
सत्तेचाळीस, ऊसतेचाळीस् ऊसत्तेचार्/सत्तेतालीस्.

मात्र, पुढील संख्याविशेषणात येणाऱ्या 'च'चा 'त' नागपुरीत होत नाही. त्रेचाळ ऊतिरेचार्, सत्तेचाळ ऊसत्तेचार्, अठ्ठेचार ऊअडेचार्,

(५) प्रमाण मराठीतील 'त्र'ने प्रारंभ होणारी संख्याविशेषणे दोन्ही बोलींत 'तिर/तिरु' असा उच्चार होतो.

उदा० त्रेचाळीस ऊ तिरेचाळीस्/ तिरेचाळ्, ऊतिरेताल्/ तिर्तालीस्/ तिरेतालीस्,
त्रेपन्न, ऊतिरुपन्/ (त्रेपन्), ऊतिरुपन्,
त्रेसष्ट, ऊतिरुसट्/ तेर्सट्, ऊतिरुसट्/ तिर्सट्.

(६) संख्यावाचक विशेषणाच्या आद्यस्थानी येणारा 'शह'चा नागपुरीत 'छ' असा उच्चार होतो.

उदा० शेहेचाळीस, ऊसेचाळीस, ऊछेहेचार्/छेतालीस्,
शांहशी, ऊशांशी, ऊछ्याआसी/छ्याशी,
शहाण्णव, ऊशान्नवू, ऊछ्यान्नव् इ०

(७) प्रमाण मराठीत व वऱ्हाडीत न आढळणारी 'दो', 'चहु/चऊ' ही रूपे नागपुरीत आढळतात. उदा० दो चव् रोजात, एक-दो दिसाचा.

(८) प्रमाण मराठीत अविकृत राहणाऱ्या संख्यावाचक युग्मातील उभयपदाला नागपुरीत सामान्यरूपाचा आदेश होतो.

उदा० एकदोन दिवसात ऊयेक्दोन् दिव्सात् ऊयेका-दो दिसात्
पाचसात दिवसांनी ऊपाच्सात् दिवसात् ऊपाचा-साता दिसात्,
सातआठ जणांनी ऊसात्आठ् झनाईनं ऊसाता-आठा जनायन्,
आठनऊ महिन्यात ऊआठ्नऊ मइन्यात् ऊआठा-नवा मह्यान्यात.

(९) एकशे, दोनशे अशा संख्याविशेषणांच्या अंती येणाऱ्या 'श'-कारा ऐवजी दोन्ही बोलीत 'स'-काराचा उच्चार होतो.

उदा० (व०,ना०) येक्से, दोन्से, तिन्से, चार्से, पास्से इ०

(१०) प्रमाण मराठीतील दोघे-दोघी-दोघं, तिघे-तिघी-तिघं, चौघे-चौघी-चौघं ह्या रूपांबरोबरच नागपुरीत 'इ'-कारान्त स्त्रीलिंगी संख्याविशेषणे 'या'-कारान्त होतात.

उदा० दोघ्या, तिघ्या, चव्घ्या इ०

(११) प्रमाण मराठीत अविकृत राहणाऱ्या पाच, सात, आठ ह्या संख्याविशेषणाला दोन्ही बोलींत 'आ' प्रत्यय लागतो.

उदा० पाचा, साता, आठा.

(१२) 'एकटादुकटा', 'एकटेदुकटे', 'एकटीदुकटी' ही प्रमाण मराठीतील रूपांप्रमाणेच दोन्ही बोलींत (व०) येक्टंदुक्टं ऊ (ना०) येक्टंडुक्टं ही अविकारी रूपे उच्चारात आढळतात.

(१३) प्रमाण मराठीप्रमाणे दोन्ही बोलींत 'एक' ह्या संख्यावाचक विशेषणाचा प्रत्ययात्मक उपयोग करून अंदाजसूचक विशेषणे तयार केली जातात.

उदा० दोनक्, पाचक्, हजारक्, तसेच पायूलीकभर, शेरकूखांड ही रूपे आढळतात.

(१४) प्रमाण मराठीत न आढळणारी 'चार् कम् बाराने', 'दोन् कम् सात्', 'येक् कम् दहा' ही रूपे नागपुरीत आढळतात. तर वऱ्हाडीत वृद्ध माहीतगारांच्या उच्चारात 'शंभराले दा कमी', 'दोन्शाले दोन् कमी' ही रूपे आढळतात.

(१५) क्रमवाचक संख्याविशेषणे ही दोन्ही बोलींत वर्णभेद सोडल्यास प्रमाण मराठीप्रमाणे उच्चारली जातात. याशिवाय अव्वल (पहिला), ढांग (शेवटचा) ऊढेंग/धेंड/ढेंड ही क्रमवाचक संख्याविशेषणे आढळून येतात.

(१६) लहान मुलांच्या पारंपरिक खेळातील क्रमवाचके दोन्ही बोलींत आढळतात.

(वऱ्हाडी) - अग्ग्ल/अगा, दुग्गल/दुगा.

(नागपुरी) - अग्गल/अग्गेल/अग्गा, दुग्गल/दुग्गेल/दुगा, तिग्गल/तिग्गेल तिगा, घेंटल् (पहिला), पद्दल (दुसरा), आड्या (तिसरा), काड्या (चवथा).

(१७) दोन्ही बोलींत आवृत्तिवाचक संख्याविशेषणे प्रमाण मराठीप्रमाणे आहेत.

उदा० एकपट ऊयेक्पट् ऊयेक्पट, दुप्पट ऊदुप्पट्, ऊदुप्पट्,
तिप्पट ऊतिप्पट् ऊतिप्पट्, एकेरी ऊयेकीरी ऊयेकिरा,
दुहेरी ऊदुहेरी ऊदुहिरा, तिहेरी ऊतिहरी ऊतिहिरा.

(१८) दोन्ही बोलींत प्रमाण मराठीप्रमाणे 'प्रति', 'हर' उपसर्ग लावून, तसेच संख्यावाचक विशेषणाची पुनरावृत्ती करून पृथकत्ववाचक विशेषण तयार होतात.

उदा० प्रति उप्रत्येक ऊप्रत्येक् ऊपरत्तेक. हर उहर्दम्, हर्राज, हर्हमेशा.
पुनरावृत्ती उएकएक ऊयेकेक् ऊयेकेक्, दोन्दोन्, तीन्तीन्, चार्चार्.

(१९) वऱ्हाडीत अंदाजी, जवळ्पास, जवळ्जवळ्, जास्तीत्जास्त, कमीत्कमी तसेच नागपुरीत 'अंदाजानं, जवर्पास्, कमसूकम्, कम्जादा, कम्पेशी इत्यादी शब्दांची संख्याविशेषणापूर्वी उपयोग करून अनिश्चितार्थ व्यक्त केला जातो.

(२०) दोन्ही बोलींत पाव्, अर्धा, पाऊन्, सव्वा/सवा, दीळ् ऊदीड्/डीड्, चत्कोर/चऊत्कर् ऊचऊत्कर्, साळे ऊसाडे, ही अंशवाचक विशेषणे आढळतात.

(२१) प्रमाण मराठीत क्रियाविशेषणाला 'ईल', 'ज', 'ला' हे प्रत्यय लागून क्रियाविशेषण साधित विशेषणे तयार होतात. यातील दोन्ही बोलींत 'ईल' प्रत्यय न लागता 'च', 'ला' हे प्रत्यय लागतात. उदा० इथला ऊयेच्चा ऊयेच्चा, कुठला ऊकुट्चा ऊकुच्चा, तिथला ऊतच्चा ऊतेच्चा, मागचा ऊमांग्चा ऊमांग्चा,

मागला ऊमांग्ला ऊमांग्ला, मागील ऊमांगचं ऊमांग्लं.

(२२) 'मामुली' (क्षुल्लक), 'तमाम्' (सगळे), सम्दं/ सबन् (सगळे), उल्चक्/ चाक् ऊउलिसा, इतुलुसक् ऊइलुसा, लय् ऊलई/इल् ही प्रमाण मराठीत न आढळणारे विशेषणे दोन्ही बोलींत आढळतात. 'बंम्' (खूप), फक्त वऱ्हाडीत तर 'लगीत्' (पुष्कळ), नाव्कूल/नाव्नाव् (संपूर्ण) फक्त नागपुरीत आढळतात.

**क्रियारूपे**

वर्तमानकाळ :

(१) वऱ्हाडी व नागपुरीत प्रमाण मराठीप्रमाणे वर्तमानकाळी क्रियारूपे एकवचनात कर्त्याच्या लिंगानुसार बदलत नाहीत. मात्र, दोन्ही बोलींत वचनानुसार क्रियारूपे बदलतात. उदा०

प्रथम पुरुष : जातो (पु०) ऊजाता, जाते (स्त्री०.) ऊजाता

द्वितीय पुरुष : जातोस (पु०) ऊजात्, ऊजाता,
जातेस (स्त्री) ऊजात्, ऊजाता.

तृतीय पुरुष : जातो (ए०व०) ऊजाते, ऊजाते,
जातात (अ०व०) ऊजातात्, ऊजातेत्.

जाते (ए०व०) ऊजाते ऊजाते, जातात (अ०व०) ऊजातात् ऊजातेत्.

जाते (ए०व०) ऊजाते ऊजाते, जातात (अ०व०) ऊजातात् ऊजातेत्.

(२) दोन्ही बोलींत प्रथमपुरुषी कर्ता स्त्रीलिंगी असतानाही एकवचनात पुल्लिंगी क्रियारूप येते (वर उदाहरणे आली आहेत.)

(३) प्रमाण मराठीत येणारा भूत वर्तमानकाळ व्यक्त करण्यासाठी दोन्ही बोलींत शुद्ध भूतकाळ वापरला जातो. उदा०

मी गेलो आहे; ऊमी गेलो हाओ, मी काम केले आहे, ऊमिनं काम् केलं.

(४) रीतिवर्तमानकाळ प्रकट करणारी स्वतंत्र क्रियापद योजना नागपुरी व वऱ्हाडीत नाही. त्याऐवजी शुद्ध वर्तमानकाळी क्रियापदेच दोन्ही बोलींत येतात.

उदा० मी जात असतो. ऊमी जातो, मी काम करीत असतो, ऊमी काम कर्तो.

**भूतकाळ :**

(१) प्रथमपुरुषी स्त्रीलिंगी एकवचनी कर्ता असल्यास प्रमाण मराठीत 'गेले' नागपुरी 'गेली' हे क्रियारूप आढळते. तर वऱ्हाडीत 'गेली'प्रमाणे 'गेलो' हे प्रथमपुरुषी पुल्लिंगी एकवचनी क्रियारूप येते.

(२) द्वितीयपुरुषी पुल्लिंगी व स्त्रीलिंगी अनेकवचनी कर्ता असताना प्रमाण मराठीत 'गेलांत' हे एकच क्रियारूप आढळते. मात्र, दोन्ही बोलींत अनुक्रमे 'गेले', 'गेल्या' अशी भिन्न क्रियारूपे आढळतात.

(३) तृतीयपुरुषी नपुंसकलिंगी कर्ता असल्यास प्रमाण मराठीत एकवचनात 'गेले' तर अनेकवचनात 'गेली' क्रियारूप येते. वऱ्हाडीत व नागपुरीत अनुक्रमे 'गेलं, 'गेले' असे क्रियारूप येते.

(४) 'मी गेलो होतो.', 'मी काम केले होते' संयुक्त क्रियापदे वापरून प्रमाण मराठीत पूर्ण भूतकाळ व्यक्त केला जातो. तर, वऱ्हाडीत व नागपुरीत 'मी गेल्तो', 'मी काम् केल्तं' अशी क्रियारूपे येतात.

(५) प्रमाण मराठीत धातूला 'ई', 'ए' (जाई, करी, हसे, बसे) प्रत्यय लागून रीतिभूतकाळ व्यक्त केला जातो. दोन्ही बोलींत प्रथमपुरुषी एकवचनी व अनेकवचनी कर्ता असल्यास 'ओ' (मी जाओ, आमी-आम्ही जाओ, मी करो, आमी-आम्ही करो) व अन्य असल्यास 'ए' (हसे, बसे) प्रत्यय लागतो.

**भविष्यकाळ :**

(१) प्रमाण मराठीत प्रथमपुरुषी कर्ता असताना भविष्यकाळ व्यक्त करण्यासाठी धातूला 'ईन', 'एन' (जाईन, सांगेन) प्रत्यय लागतात. तर, दोन्ही बोलींमध्ये 'ईन्', 'ईल्' (येईन्, येईल्, सांगीन्) प्रत्यय लागतात.

(२) द्वितीयपुरुषी कर्ता असताना दोन्ही बोलींत धातूला एकवचनात 'ईन्' (तू येसीन) तर, अनेकवचनात 'आन्' (तुम्ही कर्सान्) प्रत्यय लागतात.

(३) दोन्ही बोलींत कर्ता तृतीयपुरुषी असताना एकवचनात 'इन्', (जो खाईन्) 'अल्', (जो करंल्), 'अन्' (थो भरंन्) तर अनेकवचन असताना 'तीन्' (त्या-थ्या करतीन्) प्रत्यय लागून भविष्यकाळी क्रियारूप सिद्ध होते.

(४) आज्ञार्थी भविष्यकालवाचक रूपे तयार होताना धातूला 'साल', 'सान्' हे प्रत्यय वऱ्हाडीत लागतात. मात्र, नागपुरीत ते लागत नाहीत. उदा० कर्सान्, खासान्, घाल्सान्, घेसान्, देसान्, धुसान्, पाय्सान्, सांगसान्.

(५) वऱ्हाडीतील काही भविष्यकालवाचक क्रियापदरूपे नागपुरीत आढळत नाहीत. उदा० दीन् (देईन), घीन् (घेईन), घील् (घेईल), होईन (होईल).

**क्रियापदाचा अर्थ :**

(१) दोन्ही बोलींत द्वितीय पुरुषाच्या एकवचनी आज्ञार्थी रूपासाठी धातूला 'य्' (जाय्), 'जो' (जाजो) तर, अनेकवचनी रूपासाठी 'जा' (जाजा) प्रत्यय लागतो.

(२) प्रमाण मराठीत 'जर-तर', 'जरी-तरी', 'यद्यपि-तथापि' अशी उभयान्वयी अव्यये संकेतार्थी वाक्यात येतात. दोन्ही बोलींत 'जर', 'जरी' वाक्यात अध्याहृत राहतात. तसेच 'तर', 'तरी'साठी वऱ्हाडीमध्ये 'तं', 'तर्सा', तर नागपुरीत 'तं'चा उपयोग होतो.

उदा० (वऱ्हाडी) - तुमी काल् आले अस्ते तं समृद्धाईच्या भेटीगाठी झाल्या अस्त्या.

(नागपुरी) - तुम्ही काल् येऊन् जाते तं समृद्धायूच्या भेटीगाठी हाऊन् जात्या.

**संयुक्त क्रियापदे :**

प्रमाण मराठीत येणारी 'द्यावे लागते,' 'करावे लागते,' 'बोलावे लागते' ही रूपे दोन्ही बोलींत 'द्याआ लाग्ते', 'करा लाग्ते', 'बोला लाग्ते' अशी आढळतात. हिंदीच्या प्रभावाने नागपुरीत आढळणारी 'देनं पड्ते', 'करनं पड्ते', 'बोलनं पड्ते' वऱ्हाडीत ही रूपे शेगावकडील मुख्यत: नांदुरा या भागात 'देनं पळ्तं/ते', 'करनं पळ्तं/ते', 'बोल्नं पळ्तं/ते' अशी आढळतात.

**निषेधार्थी क्रियापदे :**

(१) प्रमाण मराठीत येणारी निषेधार्थी क्रियापदे दोन्ही बोलींत वर्णप्रक्रिया होऊन उच्चारात आढळतात.

उदा० नाही ऊनाई ऊन्हाई, नव्हता ऊनवता/ नव्हता ऊनोह्यता, नव्हे ऊनाई ऊनव्हय्, नको ऊनको ऊनोको.

(२) द्वितीय पुरुषी बहुवचनी कर्ता असताना नागपुरीत 'नाहा' हे रूप आढळते. ते प्रमाण मराठीत 'नाही' व वऱ्हाडी 'नाई' असेच उच्चारात आढळते.

(३) प्रमाण मराठी येणारी 'नये' हे क्रियापद दोन्ही बोलींत आढळत नाही. त्याऐवजी वऱ्हांडीत 'नाई' तर नागपुरीत 'न्हाई' असा उच्चार आढळतो.

उदा० हे करू नये - हे करू नाई - हे कराव् न्हाई.

असे बोलू नये - असं बोलू नाई - असं बोलाव् न्हाई.

**धातुविचार :**

प्रमाण मराठीत येणारा एकाक्षरी 'ई'-कारान्त धातू दोन्ही बोलींत 'ए'-कारान्त उच्चारला जातो. मात्र, वऱ्हाडी व नागपुरीत या धातूच्या प्रत्ययान्त रूपात थोडा भेद आढळतो. उदा०

(प्रमाण मराठी) पी-पितो-पितात-प्याला-प्यावयाला-पीत-पिताना-पिऊन-पिणे.

(वऱ्हाडी) पे-पेतो-पेतात्-प्याले-प्यासाठी-पेत्-पेतानी-पिऊन्-पेनं.

(नागपुरी) पे-पेते-पेतेत्-पेला-प्याआले-पेवाले-प्याआसाटी-पेत्-पेतानी-पेऊन्-पेनं.

**कृदन्त**

(१) दोन्ही बोलींत प्रमाण मराठीतील 'णे', 'व'-कृदन्ताऐवजी उच्चारात 'नं' आढळते.

उदा० जावे लागते-जानं पळ्ते-जानं पड्ते, करावे लागते-करनं पळ्ते-करनं पड्ते

(२) प्रमाण मराठीतील 'ताना' कृदन्त दोन्ही बोलींत 'तानी' असे होतात.

उदा० करताना-ऊकरतानी.





अनुक्रमणिका

**क्रियाविशेषणे :**

(१) वऱ्हाडातील काही भागात जसे की - अकोटकडे 'अथुल्ल' (येथील), 'तथुल्ल' (तेथील) तर अकोल्याकडे 'अच्चा', 'तच्चा' ही रूपे उच्चारात आढळतात. नागपुरी'येच्चा' (येथील), 'तेच्चा' (तेथील) ही रूपे वापरात आहेत. शेगावकडे 'अठी' (येथील), 'तठी' (तेथील) , अकोल्याकडे अनुक्रमे 'अती', 'तती', अमरावतीकडे 'अथी', 'तथी', ही स्थानदर्शक क्रियाविशेषणे उच्चारात आढळतात. मात्र, नागपुरीत 'येथी', 'तेथी', 'जेथी' इत्यादी रूपांचा वापर होतो.

(२) वऱ्हाडीत आढळणारी स्थलवाचक - 'कुकूळे' (कुणीकडे), 'कुकून्/कुखून्' (कुणीकडून), कालवाचक -'बारोमास' (प्रत्येक महिन्यात) ही नागपुरीत आढळत नाहीत. तर नागपुरीतील स्थलवाचक-कोन्‌कड् (कोणत्या ठिकाणी), कालवाचक -'अऽज्', 'तव्‌रूत्' (त्वरित), 'लोक्कर' (लवकर), 'कड्‌कूड्' (एकाएकी), 'अचानूक्' (अचानक), 'जव्‌जव्' (जो जो), 'तव्‌तव्' (तो तो), 'झुल्‌पटस्' (भल्या पहाटे) ही क्रियाविशेषणे वऱ्हाडीत उच्चारात नाहीत. 'पुळे' (पुढे) हे क्रियाविशेषण वऱ्हाडीत नित्यप्रयुक्त दिसते. तर, नागपुरीचा भर 'साम्‌ने' या शब्दावर असतो.

(३) प्रमाण मराठीत कालवाचक शब्दांना 'पासून-पर्यंत' अशी शब्दयोगी अव्यये लागून नवी कालवाचके तयार होतात. याप्रमाणे वऱ्हाडीत 'पासून-लोक्' तर नागपुरीत 'पासून्-पाव्‌तर्' या शब्दयोगी अव्ययांचा उपयोग होतो. उदा० सकाऊन्‌पासून् ऊसक्कार्‌पासून, दुपार्‌लोक् ऊदुफ्फार्‌पाव्‌तर् इ०

(४) नागपुरीत आढळणारी आधिक्यवाचके - 'लगीत', 'खूब्', 'बहुत्', 'भाई' (सं०बहु), 'शिवाई'. पर्याप्तिवाचक - वऽस्, वाजब् (वाजवी). श्रेणीवाचक - इलूइलू ही संख्यावाचक क्रियाविशेषणे वऱ्हाडीत उच्चारात आढळत नाहीत. तर, वऱ्हाडीतील 'गंज्' हे पर्याप्तिवाचक संख्यावाचक क्रियाविशेषण नागपुरीत आढळत नाही. वरील भेद सोडल्यास अन्य क्रियाविशेषणे दोन्ही बोलींत (वर्णभेद सोडल्यास) समान आहेत.

**शब्दयोगी अव्यय :**

(१) प्रमाण मराठीत आढळणारी शब्दयोगी अव्यये थोडा वर्णभेद सोडल्यास दोन्ही बोलींत सारखी आहेत.

उदा० अगोदर, आधी (प्र०) ऊआंधी/दी (व०) ऊआंधी (ना०),
कडे ऊकळे ऊकऽड्, काठ ऊकाठी ऊकाठी,
खाली ऊखाल्‌तं/खाली ऊखाल्‌तं/खाल्या.
जवळ ऊजोळ्/नेटी ऊजव्‌र, पेक्षा ऊपेक्शा/पक्षा ऊपरस्/परीस्/पक्शी,
साठी ऊसाठी ऊसाटी.

( २ ) नागपुरीत आढळणारी पुढील शब्दयोगी अव्यये वऱ्हाडीत आढळत नाहीत.

पर्यंत ऊ(लोक्) ऊपावृतर्, (पर्यंत) ऊ(लोक्) ऊवरि, शी ऊ(संगं) ऊशिन्.

( ३ ) शब्दयोगी अव्यये दोन्ही बोलींत अर्थ व वर्णदृष्ट्या मोठ्या प्रमाणात समान आहेत.

कडून ऊकून् ऊकून्/खून, जोगे ऊजोग्ता/ जोगा ऊजोग्ता/जोगा,
तर ऊतं ऊतं, पासून ऊपासून् ऊपासून्,
प्रमाणे ऊपर्मानं ऊपर्मानं, बरोबर ऊबरोबर्, ऊबराबर्/बरूबर्,
बाहेर ऊभईर् ऊबाह्यरं/भाईर्, भोवती ऊभव्ताल् ऊभव्ताल्,
मध्ये ऊमंधात् ऊमंधातं/मंधातं/मंधी, मागे ऊमांग ऊमांग,
मुळे ऊपायी ऊपायी, योग्य ऊजोग्ता/जोगा ऊजोग्ता/जोगा,
वर ऊवर्/वर्तं ऊवर्/वर्तं, विषयी ऊबा-यात ऊइशी/विशी,
शिवाय ऊवाचून् ऊवाचून्/सिवा, समोर ऊदेख्ता/साम्ने ऊदेख्ता/साम्ने,
सारखा ऊवानी/सार्का ऊवानी/सार्का, सुद्धा ऊही/बी ऊही/बी,
सोबत ऊसंगं ऊसवं/संगं.

( ४ ) इतर भाषांतून दोन्ही बोलींत शब्दयोगी अव्यये आलेली आहेत.

उप्पर (हिंदी) ऊउप्पर ऊउप्पर, पीछे (हिं०) ऊपिच्छा ऊपिच्छे,
बगैर (हिं०) ऊबिगर् ऊबिगर्, बिना (हिं०) ऊबिना ऊबिना,
लग्न (संस्कृत) ऊलागून् ऊलागून्, सम्मुखर (सं०) ऊमोहरं ऊमोह्यरं,
लाइक (अरबी) ऊलायक् ऊलाइक्/लायक्,

**उभयान्वयी अव्यये :**

दोन्ही बोलींत उभयान्वयी अव्यये सारखीच आहेत. उदा०

समुच्चयबोधक : आणि ऊ अन्/आन्, आणखी ऊआन्खीन्/आनीक्,
शिवाय ऊशिवाय् ऊसिवा.

विकल्पबोधक : (अथवा) ऊअगर्, (नाही तर) ऊनाईत्नं ऊन्हाइतं, की ऊका.

कारणबोधक : कारण की ऊकाऊन्/काहून् का ऊकारन्/काहून/काऊन् का.

परिणामबोधक : म्हणून ऊम्हनून्सन्या ऊम्हूनून्सन्या, तेव्हा ऊतवा, सबब ऊसबब.

उद्देशबोधक : म्हणून ऊम्हनून्सन्या ऊम्हून्सन्या/म्हनुन्सन्या/म्हून.

संकेतबोधक : जर-तर ऊजर्मा-तर्मा/जर्- तं ऊजर्-तं/जर्कर्ता-तं/अगर्-तं.
('जर्'चा दोन्ही बोलींत स्वतंत्र प्रयोग होईलच असे निश्चित सांगता येत नाही.)

न्यूनत्वबोधक : परंतु ऊपर्, पण ऊपन्.

स्वरूपबोधक : म्हणून ऊम्हनुन्सन्या ऊम्हुन्सन्या/म्हनुन्सन्या, म्हणजे ऊम्हन्जे ऊम्हन्जेन्.





अनुक्रमणिका

**केवलप्रयोगी किंवा उद्‌गारवाचक अव्यये**

आनंददर्शक : (वऱ्हाडी) वारे वाऽऽ, वा जी वा!, वा! वा!
(नागपुरी) वाव्वा! व्वा! -आहाहा!

शोकदर्शक : (व०) अरेऽऽ बाप रेऽऽ, अरे अरे! अरेरे!, अरे अरे अरे!, माय बई वऽऽ!.
(ना०) आरारा (अरेअरे), आरे देवा!, आगा देवा ना!, आव माय् वऽ!,
आरे बापा रेऽ!, आरे ओर आरे!

आश्चर्यदर्शक : (व०) अरे बापा रे!, अरे लेक्!, अरे देवा!, अव् माय् व!, अई माय्!,
आई माय्, माय् बई व!
(ना०) बाप्पा!, बापरे!, खर्‌खुरं!, अई!, अईमाय्! -खरं का वं!, आबा!

संमतिदर्शक : (व०) हावऽऽ!, हूऽऽ! व्वा वा!,
(ना०) जि हो!, हो!, य्येस् झालं!

प्रशंसादर्शक : (व०) वारेऽऽ पट्ट्या!, मस्तऽऽ!, याले म्हन्तात्!, अरे बहादरा!
(ना०) मस्तवारे पठ्ठे!, यवं रे पठ्ठे!, शाब्बास्!, चालू दे!.

विरोधदर्शक : (व०) हट्ट लेका!, हेऽऽ!, काई लेका!, वा बे वाऽऽ!
(ना०) हट्, हुडूत्, धुत्‌तिच्यां!, ह्ये:!, -अरे वाऽ, हात्‌तिच्या तऽ!,

स्तब्धता-मौनदर्शक : (व०) चूप्!, मुक्का! (ना०) चुप्, गिटक्.

| संबोधक | | (ए०व०) | (अ०व०) |
|---|---|---|---|
| पुल्लिंगी | (व०) | ओऽऽ!, ओ होऽऽ! | अहोऽऽ! |
| | (ना०) | अेऽ, आगा, अऽय | अजी. |
| स्त्रीलिंगी | (व०) | अरेऽऽ!, अवऽऽ!, | ओऽऽ!, |
| | (ना०) | अेऽ, अगे, आवऽ, | याऽऽ!. |
| नपुंसकलिंगी | (व०) | अयऽऽ!, | अयऽऽ!. |
| | (ना०) | अेऽ, | याऽ. |

दोन्ही बोलींत काही शब्दांचा/शब्दसमूहांचा उपयोग केवलप्रयोगी अव्ययांसारखा केला जातो.

(व०) इची बईन, हाततिच्या मायले नेवऽऽ तऽ.

(ना०) बहीन्, हात्तिचिबहीन्, हात्तिच्यामयाले नेवऽ तऽ, माय्,

**शब्दविचार :**

वऱ्हाडी आणि नागपुरी बोलींत स्वत:चा शब्दसाठा असला तरी इतर भाषांतून अनेक शब्द आलेले आहेत. ते शब्द कधी जसेच्या तसे तर कधी वर्णप्रक्रिया होऊन उच्चारात आढळतात. त्याप्रमाणेच उपसर्ग व प्रत्यय लागून तयार झालेले, सामासिक, अभ्यस्त शब्द मोठ्या प्रमाणात आढळतात.

**उपसर्गघटित शब्द :**

( १ ) दोन्ही बोलींत संस्कृत, फार्सी-अरबी उपसर्ग-घटित शब्द आढळतात.

उदा० संस्कृत : अ (आ)-अधार्, अन् (अनु)-अनुभव ऊअन्भव्,
अव् (अव)-अव्तार् इ०

फार्सी-अरबी : ऐन-अइन्वक्तावर्, कम-कम्जोर्, दर-दरोज्/दर्रोज्,
ना-नाहक्, बद-बदनाम्/बद्लाम, बिन-बिन्घोर् इ०

( २ ) दोन्ही बोलींत प्रत्ययघटित शब्द तयार होताना लागणाऱ्या प्रत्ययाबाबत साम्यभेद आढळतो. नागपुरी बोलीत प्रमाण मराठीत व वऱ्हाडी बोलीत न आढळणारे काही प्रत्यय आढळतात.

उदा० अक-लिब्बक्, लिच्चक्, अड-खिप्लड्,
अस-पट्टस् (पिटणे), आड-खटाड्, गोटाड्, नंगाड्.

( ३ ) दोन्ही बोलींत सामासिक शब्द आढळतात.

उदा० हर्रोज, जलम्खोळ, ऊजलम्खोड्.

**अभ्यस्त शब्द :**

पूर्णाभ्यस्त, अंशाभ्यस्त व अनुकरणवाचक असे सर्व प्रकारचे अभ्यस्त, तसेच द्विरुक्त शब्द दोन्ही बोलींत आढळतात.

पूर्णाभ्यस्त : कईकई ऊकहीकही(कधीकधी),
कायाकाया ऊकाराकारा(काळाकाळा),
धाऊधाऊ(धारूनधारून).

अंशाभ्यस्त : बारीक्चिरीक् ऊबारीक्चुरीक्, बोकळ्बाकळ ऊबोकड्बाकड्,
सळ्ळेगिळ्ळे ऊसड्लेगिड्ले.

अनुकरणवाचक : घनघन्, गपागप्, तन्तन्, बदाबद्.

द्विरुक्त शब्द : किळाकिटकूल ऊकिडाकिट्कूल, देनंघेनं, सांडउबळ ऊसांड्उबड्,
सोळ्बांध् ऊसोड्बांध.

**वाक्यरचना**

केवलवाक्ये, संस्कृत वाक्ये आणि संमिश्र असे वाक्यांचे तिन्ही प्रकार दोन्ही बोलींत आढळतात.

केवल वाक्य : (वऱ्हाडी) तो अजून वाव्रातून् याय्चा आये/हाये.
(नागपुरी) थो अद्याप् वाव्रातून यावस् हाये.

संयुक्त वाक्य : (व०) मी त्याले मायाकून् सांगून् पायुतो तर्मा तो आय्कालेच्
रिकामा नाई.

(ना०) मी त्याले माह्याखून सांगून् पाह्यसनं पर् थो आय्कालेच् रिकामा न्हाई.

संमिश्र वाक्य : (व०) बिगीबिगी चाल् म्हन्लं तं धावत् धावत् गेलं अन् आता पळ्ळं तं बोंबलून् रायलं.

(ना०) हरूहरू चाल् म्हन्लं तं धाव्वत् धाव्वत् गेलं न् आता पळ्लं तं बोंबलून् राह्यलं.

निषेधार्थी वाक्य : (व०) ढोराईले मोकाट् सोळू नको.

(ना०) ढोरायले मोकाट् सोडा नोका.

आज्ञार्थी वाक्य : (व०) माह्या मांगं घरावर् ध्यान् ठेव्जा.

(ना०) माह्या मांगं घराकड् ख्याल् ठेव्जा.

प्रश्नार्थक वाक्य : (व०) कोन्तं पोट्ट त्या झाळावर येंगून रायलं?

(ना०) कोन् पोट्टं थ्या झाडावर् येंगून् राह्यलं, आं?

एकूणच, वाक्यरचनेच्या बाबतीत प्रमाण मराठी, वऱ्हाडी व नागपुरी यांच्यात भेद आढळत नाही.

**इतर भाषांचा प्रभाव :** गोंडीच्या प्रभावाने नागपुरीत ‘ळ’चा ‘र’ होतो. वऱ्हाडीत असा भेद आढळत नाही. तसेच, टाली (गाय), सरी (रस्ता), चिला (शेवाळ), चिरा (दगड), होला (मोठा) असे शब्द गोंडीतून नागपुरीत आले. वऱ्हाडी आणि नागपुरीत भेद निर्माण होण्यास इतर कारणांप्रमाणे गोंडीचा नागपुरीवरील प्रभाव हे मुख्य कारण आहे. वऱ्हाडीत गोंडीतून काही शब्द आलेले आहेत, मात्र त्याचे प्रमाण नागपुरीपेक्षा अल्प आहे.

**शब्दसंग्रह :** वसंत वऱ्हाडपांडे ह्यांनी आपल्या ‘नागपुरी बोली : भाषाशास्त्रीय अभ्यास’ ह्या पुस्तकात नागपुरी बोलीचा एक हजार पन्नास शब्दांचा संग्रह दिला आहे. त्यातील ५४६ शब्द वऱ्हाडीत उच्चार व अर्थदृष्ट्या समान आढळतात. तर, १७२ शब्दांमध्ये दोन्ही बोलींत थोडा वर्णभेद आढळतो. एकूणच, ह्या संग्रहात वऱ्हाडीत न आढळणारे नागपुरीतील ३२९ शब्द आहेत.

■

संदर्भ :

( १ ) काळे, रावसाहेब. ‘वऱ्हाडी बोली व तिच्या स्वरूपाचा चिकित्सक अभ्यास’ (अप्रकाशित प्रबंध), संत गाडगेबाबा विद्यापीठ, अमरावती, २०११.

( २ ) वऱ्हाडपांडे, वसंत. ‘नागपुरी बोलीचा भाषाशास्त्रीय अभ्यास’, इंदिरा प्रकाशन, नागपूर, १९७२.





अनुक्रमणिका

ज्याची त्याची प्रचीती

# धमाल शब्दरंजन

-शरदिनी मोहिते

आम्ही लहान असताना आमचा दादा नेहमी इंग्रजी शब्दकोडी सोडवत बसलेला दिसायचा. एकदा त्या चौकोनांच्या जगात रमला की रमलाच तो... कशाकडे म्हणून लक्ष नसायचं त्याचं... त्याला ऑफिसला जायला उशीर झाला की आई त्याला ओरडायची... ओळखीपाळखीचे लोक म्हणायचे, 'याला एक नादच लागलाय हा...' पण कोणी काही म्हणो, उत्तरादाखल दादा फक्त हसायचा, आणि आपल्या कामांला निघून जायचा... चौकोनांच्या या आगळ्या जगाचं असं ओझरतं दर्शन मला लहानपणीच झालं...

कधी सहज गंमत म्हणून, तर कधी शिणलेल्या मेंदूला विरंगुळा म्हणून, तर कधी विचारशक्तीला योजनाबद्ध व्यायाम पुरवण्यासाठी म्हणून - मेंदू सतत कार्यक्षम राहावा, त्याची कार्यशक्ती टवटवीत राहावी, म्हणून अनेक देशात एक उपचारपद्धती म्हणूनही कोडी सोडवण्याच्या बाबीला भरपूर महत्त्व दिले जाते - शब्दसंपदा वाढवण्याचा एक उपाय म्हणून एखाद्या वेगळ्याच भाषेचा अभ्यास करताना त्या भाषेशी अधिक ओळख व्हावी यासाठी शब्दकोडी सोडवली जातात. शब्दक्रीडा, शब्दरंजन, शब्दखेळ, शब्दपट, शब्दशोध, शब्दवेध, अक्षांश-रेखांश, टाइमपास, शब्दसाधना घराघरातून अशी निरनिराळी नावे घेऊन समोर येणारे काळ्या, पोकळ, भरीव चौकोनांच्या चौकटी पुढ्यांत घेऊन मन लावून कोडी सोडवीत बसलेली माणसे हा क्वचित चेष्टेचा विषय होतो. पण चौकोनांच्या या विश्वाची आगळीच मोहिनी जनमानसावर पडलेली आढळते.

वाचकांना मनापासून आवडणारी निरनिराळ्या प्रकारची शब्दकोडी जवळजवळ सर्वच भाषांतील नियतकालिकं सादर करतात. कधी कोडी छोटी तर कधी मोठी, खूपच मोठीही असू शकतात. विषय वेगवेगळे असतात. सर्व विषय - धर्म, राजकारण, साहित्य, कला हाताळणारी, नाट्य-चित्रपट क्षेत्रविषयक, निरनिराळे शास्त्रीय विषयही हाताळणारी शब्दकोडी त्या त्या प्रकाशनाने ठरवलेल्या धोरणानुसार प्रकाशित होतात. काही दैनिकांतून रोज, काही साप्ताहिकांतून आठवड्याने, काही मासिकांतून, वार्षिकांतून ही लहानमोठी शब्दकोडी प्रकाशित केली जातात... काही प्रकाशने उत्तरे पुढील अंकात अन्यत्र देण्याचा उपक्रम करतात. काही अंक वाचकांना उत्तरे सोडवून ठरावीक मुदतीत आपल्या कचेरीच्या पत्त्यावर मागवतात; बक्षिसांची योजना असते. काही कोडी वाचकांनी आपणच सोडवून (कुठे न पाठवता) मोकळे व्हायचे असते... कधी कधी बहुधा काळेच असणारे भरीव





अनुक्रमणिका

भाग चांदणी किंवा फुलांचे आकार टाकून चौकट आकर्षक केली जाते. उभे, आडवे, तिरके, वरून खाली, खालून वर, डावीकडून उजवीकडे, उजवीकडून डावीकडे सरकणाऱ्या एकेका अक्षराचा वेध घेत शब्द आणि शब्दार्थ काढण्यात मन रमून जाते हे मात्र खरे.

कधीकधी तीन-तीन अक्षरांची आकर्षक मांडणी केलेली असते, कधी एकाक्षरी शब्दही आढळतो - ढ, ब्र, मे, जू (बैलाच्या मानेवरचे), ओ, हो, ढो, बे, छे... कधी प्रचंड मोठे शब्द, म्हणी, वाक्‌प्रचार, काव्यपंक्ती यांचा ज्ञानेश्वरांची ओवी, तुकारामांचा अभंग, रघुनाथ पंडितांचे काव्य, एकनाथी भारूड, मोरोपंतांची आर्या, दासबोध, इत्यादीतील पंक्तींचा वापर केला जातो, तर गाजलेली लोकप्रिय गीते, कविता कधी गीतरामायण तर कधी लोकप्रिय चित्रपट, नाट्यगीतेही योजलेली असतात. काव्यपंक्ती कधी संपूर्ण आठवाव्या लागतात, तर कधी योजकांनी अर्ध्यामुर्ध्या दिलेल्या असतात. त्या पूर्ण करायच्या असा प्रकार असतो. प्रसिद्ध व्यक्तींची नावेही कोड्यात असतात. उदा० महर्षी धोंडो केशव कर्वे, ईश्वरचंद्र विद्यासागर, तसेच कधी लाल बाल पाल, किंवा भगतसिंग, राजगुरु, सुखदेव हे एकत्र... अशा महान व्यक्तिमत्त्वांची सादर आठवण होते.

कधीकधी शब्दरचनाकार जुळवाजुळव म्हणून कोड्याचा एक प्रकार देतात. दोन अक्षरी शब्दांचा एक संच, तीन अक्षरी, चार, पाच, सहा अक्षरी असे शब्दसंच देतात. दोन अक्षरी शब्द बरेच असतात, तर सहा अक्षरी तीन, चार किंवा पाच शब्द, पाच अक्षरी जरा जास्त... हा प्रकार... याच वेळी काही मोकळ्या ओळीत मधेच कुठेतरी एखादे अक्षर दिलेले असते. मोकळ्या चौकोनांच्या ओळीत ते अक्षर कितवे ते मोजून मग शब्दसंचांमधे तसे शोधून शब्द योजणे शक्य होते. हे कोडे तसे पटकन सोडवून होते... पण त्याचीही गंमत वेगळीच असते. काही मोठी कोडी असतात, त्यांची नावेही त्यांना शोभेशी असतात. जम्बो, महा शब्दकोडे इत्यादी.

काही वेळा कोंडी होते. साधे शब्दही ऐन वेळी सुचत नाहीत, आठवत नाहीत. मग आसपासचे शब्द सोडवून पाहताना त्यातील एखाद्या अक्षराने हा शब्दही सुटून जातो... बुद्धीला ताण जरी पडला तरी काही शब्दांनी, काही ओळींनी पुन:प्रत्ययाचा आनंद मिळतो. कारण काही कारणांनी आणि कारण नसतानाही आठवणीतून, वापरातून गेलेले शब्द अचानक समोर येतात... पुष्कळ वचने, कवने, काव्यपंक्ती फार काय, शब्ददेखील आपल्याला आवडलेले असतात. विशेष वाटलेले असतात; पण फार काळ त्यांची आठवण झालेली नसते. ती या निमित्ताने होते... 'जाळीमंदी पिकली करवंदं' आठवल्यावर आपोआप ताल धरला जातो!

शब्दकोडी सोडवताना पुष्कळदा आपण फारसे वापरत नसलेले शब्द चौकोनात उमटतात. ते शब्द इतके वेळा येतात की वाटते, त्या शब्दांचा फार मोठा आधार

रचनाकारांना वाटत असावा. अशा शब्दांपैकी काही शब्द असे आहेत : शालक, राका, साकव, मरकत, शील, रमल, रदन, रसद, रजक, रयत, परीस, साज, कपाळभर लावलेले कुंकू (मळवट), सागवान, देवदार, गगन, शिवार, जलद (ढग), ठसा, बिनदुधाचा चहा (कोरा), डीर, यमल, रकमाला, रामरस, बटीक, अनवरत, काव्यात माझे (मम)...

शब्दकोडी रचणाऱ्यांना काही गोष्टी आवडतात असे दिसते- डीर, भीमाचे आयुध (गदा), गवार, चाकवत, वाल, रसना, हत्तीच्या गंडस्थळातील स्राव(मद), टमटम, सक्त, रम, नवार, शिवाजी महाराजांचा द्वितीय पुत्र, डर... रमताराम...

पुष्कळदा अर्थाची ओढाताण केली जाते. ऱ्हस्व दीर्घाचाही ताळ रहात नाही. स, श चा गोंधळ असतो. शब्द जुळणी साधण्यासाठी असे करावे लागते. काही तरीच जोड्या वापरल्या जातात- जट-पाचट, नथ-लाथ, पन्नास-गन्ना, नमक-नरक, यम-रम, आवाज-आसूड, खिळवलेली दृष्टी-टक साठी इंग्रजी 'लक' येते, नवरा जिवंत असलेली स्त्री म्हणून सवाष्ण येते. सधवा येते, जिचा नवरा मेला आहे ती मात्र सहसा गतधवाच असते. वटपौर्णिमेला वटसावित्री म्हटले जाते. नेहमी नस किंवा शीर असलेली कधीतरी 'नीला' होते! कधी अमुकसाठी इंग्लिश, कधी हिंदी, कधी संस्कृतही शब्द योजायला सांगितले जाते. कधी आडवा शब्दही इंग्लिश आणि उभा शब्दही इंग्लिश असा प्रकार होतो. कळस म्हणजे अमुक एक शब्द उलटा लिहा अशी सूचना होते. क्रम बदलून तसे लिहिल्यावर मग त्या जागेचा मेळ बसतो!... ११५ आडवे आणि १११ उभे शब्द असलेल्या एका कोड्यात एक शब्द दोनदा लिहावा लागला. 'मत' हा शब्द एकदा विचारधारा म्हणून(५५ उभा) व एकदा अभिप्राय म्हणून (२५ आडवा) अशा प्रकारे दोनदा लिहावा लागला, तर एका कोड्यात समरस म्हणून एकदा 'रत' एकदा 'रममाण' असे दोन शब्द योजावे लागले! कधीकधी एखादा शब्द सांगताना अपेक्षित अर्थ चुकीचा सांगितला जातो. उदा : पिकातील तणाला 'रान' म्हटले गेले आहे...

जखमेतला स्राव म्हणून 'पू' किंवा 'लस' अगदी मूड घालवून टाकतो. शिवाय आता वापरात नसलेली पाण्याची कातड्याची पिशवी 'पखाल' - हिचे आता काय काम असेही वाटून जाते. तसेच खाऱ्या पाण्यातला मासा, गोड्या पाण्यातला मासा सर्वांनाच कसा माहीत असणार?

'कोड्याला म्हणजे कोडे तयार करणाऱ्याला अडचण पडू नये म्हणून ठणठणीत मिळमिळीत होते, टणटणीतही होते; पण रमतगमत, जवळजवळ, साधकबाधक असे प्रासयुक्त शब्द नेहमी येतात हेही खरे. झुळझुळ, झिमझिम, रिमझिम, असे शब्द कधीकधी सुखावून जातात. कधी अमक्या भागात वावरणारे भूत असा 'क्ल्यू' असतो, तर कधी मुसलमानी पिशाच्च खवीस होऊन अवतरते...

कधी भानामती आपला प्रताप दाखवते... इजिप्तचे जुने नाव मिसर हे तसे अस्थानी

उमटते, तर कधी पदरमोडच घडते.

उभ्या किंवा आडव्या शब्दाला समान आडवा किंवा उभा शब्द कोठेतरी योजलेला असतो तर त्या विशिष्ट शब्दाच्या अर्थाचा अरबी, फारशी, हिंदी, इंग्लिश किंवा संस्कृत (वेगवेगळ्या वेळी वेगळीच कोणती तरी पण एकच भाषा) शब्द योजावा असे मराठी शब्दकोड्यात बिनदिक्कत सुचविलेले असते!.. उदा० बहन, अमीर, गॉड इ० असे असले, तरी 'वैयाकरणी', 'प्रागैतिहासिक युग' असे भारदस्त शब्द शब्दकोड्यात उमटले की साश्चर्य आनंद होतो.

खरोखरच इतर अनेक खेळांप्रमाणे हा शब्दखेळही आकर्षक आणि आनंददायक आहे. चित्तवेधक आहे. चित्तरंजकही आहे. शब्दक्रीडेचे हे विश्व म्हणजे कोडी सोडवणाऱ्यांप्रमाणे कोडी रचणाऱ्यांच्याही आनंदाचे निधान आहे, यात शंकाच नाही!

■

**परिषद-वार्ता**

# अमराठी भाषकांसाठी मराठीचे अध्यापन

मुंबई विद्यापीठाच्या जर्मन आणि मराठी विभागाने 'अमराठी भाषकांसाठी मराठीचे अध्यापन' उत्तम रीतीने करता यावे यासाठी एक विशेष प्रकल्प हाती घेतला आहे. या प्रकल्पात शिक्षकांसाठी विविध सहा टप्प्यांची पाठ्यपुस्तके तयार करण्यात येणार आहेत. ही पुस्तके कशी तयार करावी, यासाठी दि० १० ते १२ ऑक्टोबर, २०१३ या कालावधीत मुंबई विद्यापीठात एका कार्यशाळेचे आयोजन करण्यात आले होते. या कार्यशाळेच्या उद्घाटनासाठी महाराष्ट्र राज्याच्या मराठी भाषा सल्लागार समितीचे अध्यक्ष डॉ० नागनाथ कोत्तापल्ले खास उपस्थित होते. तीन दिवस चाललेल्या या कार्यशाळेत पूर्ण राज्यातून भाषेचे निवडक अभ्यासक उपस्थित होते. या कार्यशाळेत आजवर तयार झालेल्या पुस्तकाच्या अंतरंगावर साधकबाधक चर्चा झाली आणि त्यासंबंधी काही मौलिक सूचना करण्यात आल्या. या प्रकल्पाला मराठी अभ्यास केंद्र आणि मराठी अभ्यास परिषद या मराठी भाषेच्या अभिवृद्धीसाठी कार्यरत असणाऱ्या दोन संस्थांचा सक्रिय सहभाग लाभला आहे. या कार्यशाळेचा सविस्तर वृत्तान्त पुढील अंकात प्रकाशित करण्यात येईल.

■





अनुक्रमणिका

# व्याकरणचूडामणी कृ० श्री० अर्जुनवाडकर

सरोजा भाटे

गेल्या पिढीतल्या ज्या विद्वानांनी पुण्याच्या पंडिती वारशात समृद्ध भर घातली अशा विद्वानांमध्ये एक आगळेवेगळे नाव म्हणजे कृ०श्री० अर्जुनवाडकर. संस्कृत आणि मराठी या दोन्ही भाषा आणि त्यांचे व्याकरण यावर विलक्षण प्रभुत्व हे त्यांचे वेगळेपण. वेदशास्त्रसंपन्न घराण्याचा वारसा घेऊन आरंभीच्या शिक्षणासाठी ते संस्कृत पाठशाळेत दाखल झाले. अन्य विषयांबरोबर शांकरभाष्यासारख्या तर्ककर्कश आणि प्रसन्नगंभीर शैलीत लिहिलेल्या ग्रंथाचे 'पाङ्क्त अध्ययन' त्यांनी केलं. त्यामुळे मुळातच धारदार असलेल्या त्यांच्या प्रज्ञेला तर्कनिष्ठतेचे तेज चढले. १९४६ साली मॅट्रिकच्या परीक्षेला ते बाहेरून बसले आणि पहिली जगन्नाथ शंकरशेठ शिष्यवृत्ती मिळवण्याचा विक्रम केला. ज्ञानप्रबोधिनीचे संस्थापक अप्पा पेंडसे यांच्या प्रोत्साहनाने पदव्युत्तर अध्ययनापर्यंत मजल मारून पुण्यात प्रथम वाडिया आणि नंतर स० प० महाविद्यालयात त्यांनी आपली अध्यापनाची कारकिर्द सुरू केली. प्रा० अरविंद मंगरूळकरांसारखे साक्षेपी विद्वान सहकारी म्हणून लाभल्यामुळे सरांना मराठीचीही गोडी लागली. या जोडगोळीने 'मराठी : घटना, रचना, परंपरा' अशी पुस्तिका प्रसिद्ध केली. अर्जुनवाडकर सरांचे मराठीतलं हे पदार्पण म्हणजे त्यांच्या भावी मराठीविषयक लिखाणाची नांदी होय. पुढे या दोघा विद्वानांनी अथक मेहनत करून संस्कृत साहित्यशास्त्रातील महत्त्वाच्या 'काव्यप्रकाश' या ग्रंथाची - मराठी अनुवाद, सविस्तर टीपा आणि पूर्वसूरींच्या मतांचा परखड परामर्श यांसह - १४०० पृष्ठांची चिकित्सित संपादित आवृत्ती प्रकाशित केली. संस्कृत संशोधनाच्या क्षेत्रात टाकलेल्या या दमदार पावलाला पुरस्काराच्या रूपानं महाराष्ट्र शासनाकडून दाद मिळाली. सरांनी यानंतर नैषधीयचरिताचे काही सर्ग, तसेच भगवद्गीता या ग्रंथांचे मराठीत सटीप अनुवाद हेही काम केले. हे सर्व अनुवाद त्यांच्या दोन्ही भाषांवरच्या प्रभुत्वाची साक्ष पटवतात. त्यांच्या सहभागाने सिद्ध झालेला Yoga Explained हा पातंजलयोगावरचा ग्रंथ लंडनमध्ये प्रकाशित झाला. जपानीसकट अनेक भाषांमध्ये भाषांतरित झालेल्या या ग्रंथाने सरांचे नाव सातासमुद्रापार नेले. त्यांना प्रज्ञेइतकीच तेजस्वी प्रतिभा लाभल्यामुळे त्यांच्या लेखणीतून काही अनवट काव्ये जन्माला आली. 'कण्टकाञ्जलि' या विनोदी मुक्तकांचा समावेश असलेल्या काव्याने ते संस्कृत कवी म्हणूनही सुप्रतिष्ठ झाले. 'प्रीतगौरीगिरीशम्' या त्यांच्या गीतिकाव्यावर बसवलेल्या भरत नाट्यम्चे काही प्रयोगही रंगभूमीवर सादर झाले.





अनुक्रमणिका

आपल्या अध्यापन कारकिर्दीच्या एका वळणावर सरांनी मराठीची वाट धरली आणि त्यांची लेखणी संस्कृतपेक्षा मराठीत जास्त रमली. वेंकटमाधवकृत 'महाराष्ट्र प्रयोगचंद्रिका' हे संस्कृतमधून लिहिलेले मराठीचे व्याकरण. याची मद्रासच्या ओरिएंटल लायब्ररीत असलेली पोथी सरांनी तिथे जाऊन नकलवली आणि प्रथमच संपादन करून छापली. लेखक आणि त्याचा ग्रंथ यांवर सविस्तर विवेचनासह छापलेले हे पुस्तक संस्कृत आणि मराठी दोन्हींच्या अभ्यासकांना उपयुक्त आहे. मंगरूळकर आणि वि०मो० केळकर यांनी संपादित केलेल्या त्रिखंडात्मक 'ज्ञानदेवी'ला सरांनी व्याकरणात्मक टीपांची जोड दिली. मराठी व्याकरणावरच्या त्यांच्या संशोधनाची सुरुवात मोरो केशव दामल्यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरणा'च्या संशोधित संपादनाने झाली. मुंबई विद्यापीठातल्या मराठी विभागात प्रपाठकपदी रुजू झाल्यावर त्यांनी जे मराठी प्रकल्प पुरे केले त्यातला हा पहिला प्रकल्प. हजार पृष्ठांचा हा ग्रंथ संशोधन पद्धतीचा वस्तुपाठ आहे. विद्यापीठात मराठी व्याकरण शिकवत असताना त्यातल्या वेगवेगळ्या विषयांवर त्यांचं चिंतन चालू होते. हे चिंतन 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' या पुस्तकाच्या रूपाने त्यांनी अभ्यासकांपुढे ठेवले. या पुस्तकात त्यांनी मराठी व्याकरणाच्या मळलेल्या वाटा सोडून नव्या वाटेचा शोध घेतला आहे. मराठी व्याकरणाला संस्कृत आणि इंग्रजी अशा दोन व्याकरणाच्या बेड्यात अडकवणाऱ्या आधीच्या वैयाकरणांचा खरपूस समाचार घेत-त्यांनी आपली वेगळी मते नोंदवली आहेत. ही सगळीच मते आजच्या अभ्यासकाला पटतील असे नाही; पण वेगळा विचार करायला प्रवृत्त करतील, हे नक्की. उदा० व्याकरणात स्वनांतराचा (allophone) विचार करण्याची गरज नाही असे, ते म्हणतात (पृ० १००). पण अमराठी माणसाला मराठी भाषा शिकवताना नेमके उच्चार कळण्यासाठी त्यांचा निश्चित उपयोग होईल असे वाटते. मराठीत सात ऐवजी पाच विभक्ती मानाव्या, प्रयोजक धातू हा साधित धातूचा एक प्रकार मानावा, व्याकरणात अर्थमीमांसेला स्थान नसावं. यांसारखी त्यांची मतं विचार करण्याजोगी आहेत. संस्कृत व्याकरणावर मराठी व्याकरण बेतणाऱ्या अभ्यासकांना पाणिनीचे हृदय कळले नाही, अशी खंतही ते व्यक्त करतात (पृ० ७७). त्यांनी सुचवलेल्या मराठी व्याकरणाच्या नव्या मांडणीचा विचार केला तर लक्षात येते की सरांनी पाणिनीच्या हृदयात केवळ अवगाहनच केले नाही तर आपली मांडणी त्यांच्या तंत्रावर बसवून 'त्या' हृदयीचं 'या' हृदयी घातले आहे. लाघव, अपोद्धार, सामान्यविशेषभाव यांसारख्या पाणिनीय तंत्रविशेषांवरच त्यांची नवी मांडणी आधारलेली आहे. आपली ''विचाराची आणि मांडणीची पद्धती संस्कृत शास्त्रीय वाङ्मयाने पोसलेली आहे. तर्कशुद्धता हा तिचा मूलभूत निकष आहे.'' (पृ० ९) असे ते या पुस्तकाच्या प्रास्ताविकात म्हणतात. त्याचा पुरेपूर प्रत्यय पुस्तक चाळले तरी येतो. संस्कृत शास्त्रांची ''तर्ककर्कश चर्चा करताना वादी प्रतिवादी ही चौकट'' (पृ० १०) त्यांनी स्वीकारली आहे. त्यामुळे

त्यांच्या लिखाणाला नेमकेपणाची शिस्त लाभली आहे.

त्यांनी लिहिलेला 'मराठी व्याकरणाचा इतिहास' हा एक महत्त्वाकांक्षी प्रकल्प होता. जवळजवळ सात ते आठ शतकांच्या कालखंडावर पसरलेल्या या इतिहासात त्यांनी लहानमोठ्या १०९ व्याकरणग्रंथांचा परामर्श घेतला आहे. सुमारे साडेचारशे पृष्ठांत हा परामर्श सामावताना त्यातले ठळक तपशील गळणार नाहीत आणि विचार नेमकेपणाने अभ्यासकांपर्यंत पोचतील याची काळजी त्यांनी घेतली आहे. यातल्या नोंदी तयार करताना त्यांनी किती मेहनत घेतली असेल, याची कल्पना या इतिहासाची काही पाने चाळली तरी येते. त्यांनी प्रयत्नपूर्वक कमावलेलं कसदार निरूपणकौशल्य इतर ग्रंथांप्रमाणे या ग्रंथातही प्रतिबिंबित झाले आहे. त्याहून महत्त्वाची बाब म्हणजे याआधीच्या 'मराठी व्याकरण : वाद आणि प्रवाद' या पुस्तकात भाषा, शास्त्र आणि व्याकरण याविषयीचा जो तात्त्विक दृष्टिकोण मांडला आहे, त्याचे उपयोजन या इतिहासात केले आहे, असे त्यांनी जे प्रास्ताविकात म्हटले आहे ते पुरेपूर पटते. ''तडजोड नावाच्या प्राण्याला शास्त्राच्या आसपासही फिरकू देण्याचं कारण नाही.'' (प्रास्ताविक पृ० १३) हा त्यांनी घातलेला दंडक त्यांनीही पाळला आहे. शास्त्र म्हणजे काय याची त्यांनी केलेली मांडणी म्हणजे व्याकरणाचेच नव्हे; तर कोणत्याही शास्त्राचे लेखन करणाऱ्यासाठी मार्गदर्शक नियमावली आहे.

अर्जुनवाडकर सरांचे समग्र लेखन भावी अभ्यासकांना, विशेषतः संस्कृत शास्त्रांच्या अभ्यासकांना, एक महत्त्वाचा संदेश देते : पारंपरिक शास्त्रांचे 'पाङ्क्त अध्ययन' म्हणजे केवळ त्या त्या शास्त्रांच्या प्रमेयांचे सखोल आकलन नव्हे; ही शास्त्रे रचणाऱ्या प्रज्ञावंतांनी विकसित केलेली बौद्धिक कौशल्ये आत्मसात करणे हाही त्या अध्ययनाचा अविभाज्य भाग आहे. सरांनी तर याही पुढे जाऊन आपल्या लिखाणात त्यांचे उपयोजन करून प्राचीन भारतीय ज्ञानसंपदेचा एक ठळक विशेष अधोरेखित केला आहे. जमेल तितकी त्यांची वाट अनुसरणे, हीच त्यांना खरी श्रद्धांजली ठरेल. ■

## चुकीची दुरुस्ती

'भाषा आणि जीवन' व ३० अंक ३ मधील दुरुस्त्या :

१. अनुक्रमणिकेमध्ये व पृ० १८ वर शीर्षकाखाली चिन्मय धारूरकर यांच्या आधी 'मूळ लेखक सोस्यूर', असा उल्लेख हवा.
२. पृ० ११, खालून पाचवी ओळ - बी०सी० मर्ढेकर याऐवजी बा०सी० मर्ढेकर हवे.
३. पृ० २०, वरून दुसरी ओळ - सोयूर ऐवजी सोस्यूर हवे.
४. पृ० ३६वर शके १९९१ व शके १९९२ याऐवजी शके ११९१ व शके ११९२ हवे.
५. पृ० ५७ वर तुळपुळे-ॲनी याऐवजी तुळपुळे-फेल्डहाऊस हवे.





अनुक्रमणिका

# संशोधनातच 'ब्रह्मानंद'

श्री०मा० भावे

'ज्ञानेश्वरी'तील एका ओवीत 'ओथंबा' हा शब्द आला आहे. ती ओवी अशी :

''तैसी प्रकृति आत्मप्रभा। खेळे गुणी विविधारंभा।
येथ आत्मा तो वोथंबा। नेणे कोण॥'' (अध्याय १३. ओवी १०८१)

ओथंबा/वोथंबा हा शब्द ज्ञानेश्वरीत इतरही अनेक ओव्यांत आला आहे.

या शब्दाचा आधुनिक मराठीत अर्थ काय याविषयी खूपच संभ्रम होता.

आजही शब्दकोशात 'ओथंबा' याचा अर्थ आश्रमाची मेढ किंवा आधार असा दिला आहे. काही अभ्यासकांनी 'वोथंबा' याचा अर्थ 'ओळंबा' असाही घेतला आहे.

तथापि या शब्दाचा नेमका उलगडा माझे मित्र प्रा० ब्रह्मानंद देशपांडे यांनी केला व तोही वेरुळच्या लेण्यातील एका शिल्पावरून. या शिल्पात जुगार खेळला जात असल्याचे चित्र आहे. त्यात एक मनुष्य डोळे फाडफाडून खेळाकडे बघत आहे. प्रा० देशपांडे यांनी अंदाज केला की, हा मनुष्य त्या खेळाचा साक्षी किंवा पंच आहे व खेळाडूत तंटा झाल्यास निवाडा करण्याचे काम त्याचे आहे. प्रत्यक्ष खेळात त्याचे काहीच पणास लागलेले नसले तरी खेळाचा पंच म्हणून त्याने दक्ष राहाणे गरजेचे आहे. आपला हा शोध प्रा० देशपांडे यांनी लेख लिहून प्रसिद्ध केला. तेव्हापासून ज्ञानेश्वरी व वेरुळची शिल्पे यांच्यातील नाते स्पष्ट झाले. 'ओथंबा' याचा अर्थ 'साक्षी' याचीही खात्री पटली. भारतीय तत्त्वज्ञानाने आत्म्याला प्रकृतीच्या विभ्रमांचे साक्षीदार मानले आहे. त्यामुळे 'वोथंबा' याचा साक्षी हा अर्थ वरील ओळीत चपखल बसतो.

प्रा० ब्रह्मानंद देशपांडे यांच्या ठिकाणी संशोधकाला लागणारी चौकस दृष्टी पुरेपूर होती व पुरातत्त्व शास्त्राच्या अभ्यासाला उपयोगी अशा सर्व साधनांचे उत्कृष्ट ज्ञान त्यांना होते. संस्कृत, महाराष्ट्री, मराठी, इंग्रजी या चारही भाषांवर त्यांचे प्रभुत्व होते. मध्यप्रदेशात त्यांचे शिक्षण झाल्याने हिंदी त्यांना अवगत होती. ब्राह्मी लिपीचे चांगले ज्ञान त्यांना होते. महानुभावांची कूट भाषा ते वाचू शकत असत. खेरीज, शिलालेख व ताम्रपट यांचे ठसे कसे घ्यायचे ही हातोटी त्यांना साधली होती. त्यामुळे पुरातत्त्वशास्त्राच्या अभ्यासाची त्यांची उत्तम तयारी होती.

प्रा० ब्रह्मानंद यांची स्मरणशक्ती दांडगी होती. योग्य वेळी नेमकी संस्कृतवचने, मराठी कवितातील कडवी, शिलालेख व ताम्रपटातील उतारे त्यांना आठवत असत व त्यांच्या योगाने ब्रह्मानंदांशी संभाषण होणे हा मोठा आनंदाचा प्रसंग असे. प्रा० विजय

देव सांगत होते की, ब्रह्मानंदांनी एकदा त्यांना (पक्षी : विजय देवांना) 'गो०नी०दां०'च्या 'पूर्णामायची लेकरे' या कादंबरीतील १३ पाने धडाधडा म्हणून दाखविली होती. अमुक शिलालेख कुठे सापडला, त्याची शेवटची दोन वाक्ये निराळ्या लिपीतली कशी आहेत. इत्यादी तपशील ते सहज सांगून जात.

प्रा० ब्रह्मानंदांच्या ठिकाणी इतकी विद्वत्ता होती; निरनिराळ्या पदव्या त्यांनी मिळवल्या होत्या; उदा० ते नागपूर विद्यापीठाचे बी०एस०सी० होते. सागर विद्यापीठाचे एम०ए० (पुरातत्त्वशास्त्र) होते, नागपूरचेच पीएच०डी० व डी०लिट०ही होते; तरी सामान्य माणसे, होतकरू विद्यार्थी यांच्यात बरोबरीच्या नात्याने मिसळण्यात त्यांना किंचितही संकोच वाटत नसे. तरुण मुले हाताशी धरून त्यांना आपल्या अभ्यासविषयात पारंगत करून सोडण्याची उमेद ते कायम धरून असत. पुण्याला आल्यावर आमच्या भारत इतिहास संशोधक मंडळातील तरुण कार्यकर्ते अमोल बनकर, पराग पुरंदरे, सायली दातार यांना त्यांनी हाताशी धरले व शिलालेख-ताम्रपट कसे वाचावेत, अजिंठा-वेरुळ येथील शिल्पे कशी पाहावीत, जुन्या देवळांच्या बांधणीतील कौशल्ये कोणती, याचे उत्तम शिक्षण त्यांनी दिले. वेरुळचे लेणे दाखविताना त्यांचा उत्साह इतरांना भारावून टाकणारा असे. आपल्या मोटारीत बसवून ते पाहुण्यांना वेरुळला नेत व स्वतःच्या प्रकृतीची पर्वा न करता लेण्यातील सर्व चढ-उतार फिरून पाहुण्यांना लेणी दाखवीत. कुठे अप्रसिद्ध शिलालेख आहे अशी बातमी कळण्याचा अवकाश की, देशपांडे तेथे निघालेच!

माझा व प्रा० देशपांडे यांचा संबंध इतिहास संशोधक मंडळामुळे आला. सुमारे तीस वर्षांपूर्वी त्यांनी मंडळात महानुभाव पंथावर व्याख्यान दिले होते. अनेक संशोधकांनी महानुभावांच्या वाङ्मयाचा अर्थ लावताना अगर त्या पंथाचा इतिहास सांगताना कशा गफलती केल्या होत्या, याचे खोचक विवेचन त्यांनी केले होते. पुढे आम्ही मंडळात 'राजवाडे स्मृति व्याख्यानमाला' सुरू केली. तेव्हा मी ब्रह्मानंदांना त्यात व्याख्यान द्यायला निमंत्रण दिले व त्यांनी 'महानुभाव पंथ' हाच विषय घेतला. छान व्याख्यान झाले. डॉ० ग० ह० ऊर्फ तात्या खरे यांनी 'दक्षिणच्या मध्ययुगीन इतिहासाची साधने' नावाचा फार उपयोगी ग्रंथ तीन खंडांत तयार केला होता. त्याला तात्यांच्या स्वभावाप्रमाणे त्यांनी काटेकोर प्रस्तावनाही लिहिली होती. तथापि त्यानंतर आणखी शिलालेख व ताम्रपट सापडले होते व तात्यांच्या प्रस्तावनेतील काही माहिती कालबाह्य झाली होती. ब्रह्मानंदांनी ह्या ग्रंथाचे नव्याने संपादन करण्याची इच्छा दाखवली. ते म्हणाले, ''मला यासाठी कोणताही मोबदला नको. तात्यांसारख्या ऋषितुल्य विद्वानाच्या ग्रंथाचे नूतनीकरण माझ्या हातून होत आहे, हेच माझे भाग्य आहे.' बहुत परिश्रमाने ब्रह्मानंदांनी त्या ग्रंथाचे 'नूतनीकरण' केले. तात्यांची प्रस्तावना आम्ही कायम ठेवलीच. पण ब्रह्मानंदांची विवेचक प्रस्तावना त्याला जोडली. 'यशवंतराव चव्हाण प्रतिष्ठान, मुंबई' यांच्या साहाय्याने आम्ही

ही नवी आवृती छापून प्रसिद्धही केली.

इतिहास संशोधनात वादाचे प्रसंग हमखास यायचेच. ब्रह्मानंदांचेही अनेक नामवंत विद्वानांशी पोटतिडकीचे वाद झाले. वा० वि० मिराशी, शं० गो० तुळपुळे, रा० चिं० ढेरे, शोभनाताई गोखले ही मंडळी पुरातत्त्वातली कसलेली विद्वान मंडळी होती. पण त्यांचा आदर ठेवूनही त्यांच्याशी वाद घालताना ब्रह्मानंद बिचकले नाहीत व आपले निष्कर्ष त्यांनी ठामपणे मांडले. दुर्दैवाची गोष्ट अशी होती की, ब्रह्मानंद औरंगाबादसारख्या (विद्वत् गोष्टीच्या व्यवहारात) आडबाजूच्या गावी होते आणि आपले लेख व पुस्तके नावाजलेल्या नियतकालिकातून किंवा प्रसिद्ध प्रकाशकांकरवी प्रसिद्ध व्हावीत अशी काळजी त्यांनी घेतली नाही. त्यामुळे ब्रह्मानंदांच्या लिखाणाची त्याच्या गुणवत्तेच्या मानाने नावाजणी झाली नाही.

भारत इतिहास संशोधक मंडळावर त्यांचा अतोनात लोभ होता व तात्या खरे हे त्यांना गुरुतुल्यच होते. औरंगाबादच्या सरस्वतीभुवन महाविद्यालयातून निवृत्त झाल्यावर त्यांनी पुण्याला आपल्या मुलाकडे येऊन राहण्याचे ठरविले. ही २०१० सालातील गोष्ट. ते मला म्हणाले, ''भावे, माझा सर्व ग्रंथसंग्रह आणि वस्तुसंग्रह मी मंडळाला देणार आहे. तुम्ही त्या संग्रहाची पाहणी करण्यास औरंगाबादला या.'' मंडळातील एक अभ्यासक अनुराधा कुलकर्णी व मी असे दोघे औरंगाबादला गेलो. त्या वेळी देशपांडे पतिपत्नींनी आमचे जे अगत्य केले ते त्यांच्या वैदर्भी बाण्याला धरूनच होते. ब्रह्मानंदांचा संग्रह म्हणजे अलिबाबाची गुहाच होती. नाना अनवट वस्तू व दुर्मीळ ग्रंथ त्या संग्रहात खचून भरलेले होते. विद्यावाचस्पती या पदवीसाठी लिहिलेले प्रबंध होते, वृत्तपत्रांची कात्रणे होती, लेखी पोथ्या होत्या, नाणी होती व ताम्रपटही होते. नंतर आठ दिवसांनी आम्ही मंडळातील पाच-सहा कार्यकर्त्यांचा संघच औरंगाबादला पाठवून त्या संग्रहाची तपशीलवार यादी करविली व सबंध साठा पुण्याला आणला. आमच्या तरुण कार्यकर्त्यांचा पाहुणचार इतक्या आपुलकीने देशपांड्यांनी केला की, ते सर्व जण त्यांचेच होऊन गेले. औरंगाबादेत ब्रह्मानंद अगदी रंगून गेले होते. मराठवाड्यातील जुनी देवळे, लेणी, किल्ले, नद्या, गावे, घाट या सगळ्यांची मोहिनी त्यांना पडली होती. तेथील समाज, अभ्यासक, राजकीय कार्यकर्ते, उद्योग-धंद्यातील व्यक्ती या सर्वांशी त्यांची घसट होती. महानुभावांचे मठ, रामदासी पंथाचे मठ, जुन्या पाठशाळा व शास्त्री यांच्याशी त्यांचे मैत्रीसंबंध होते. पानवाले, हातगाडीवाले, चहाचे टपरीवाले यांच्यापासून तो औरंगाबादेचे महापौर, आमदार, खासदार, या सगळ्यांशी ते सहजपणाने बातचीत करीत. मराठवाड्यात शिवसेना बांधली व फोफावली याचे बरेच श्रेय ब्रह्मानंदांकडे जाते.

अशा स्थितीत पुण्याला आल्यावर ब्रह्मानंदांची 'जळाविण माश्यां'ची व्हावी तशी तडफड होऊ लागली. दर आठ दिवशी ते औरंगाबाद, पैठण, बीड, तुळजापूर अशा

ठिकाणी निमित्त काढून जात. महानुभावाच्या मठात राहात. कुठे एखादा शिलालेख तपासत. कोणत्या तरी ताम्रपटाची चाहूल त्यांना लागलेली असे. कधी काही संस्था त्यांचा सत्कार करीत व पदवी किंवा पुरस्कार देत. परत आले की, ते मला फोन करून झाल्या गोष्टींची माहिती देत. तो त्यांचा विरंगुळा असे. मी त्यांना नेहमी विनवत असे की, ''ब्रह्मेन्द्रस्वामी! अशी वणवण करू नका. आजारी पडाल.'' गेल्या वर्षभरात ब्रह्मानंद अगदी थकले होते. उच्च रक्तदाब, हृदयविकार, डोळ्यांत रक्त उतरणे अशा व्याधींनी त्यांना घेरले होते. गेले सहा महिने तर दर दिवसाआड त्यांना रक्तशुद्धी (डायलिसिस) करून घ्यावी लागत होती. पण अशाही स्थितीत ब्रह्मानंद लिहीत-वाचत होते, प्रवासाला जात होते, भाषणे देत होते. 'तब्येत चांगली आहे.' असे सांगत होते. त्यातच त्यांच्या पत्नीला असाध्य विकार झाल्याचे निदान झाले. बाई रुग्णालयात होत्या.

ब्रह्मानंद ६ ऑगस्टला वारले. त्यांच्या वयाला त्र्याहत्तर वर्षे पूर्ण झाली होती. ते जातील असे वाटले नव्हते - त्यांच्या आजारांची यादी लक्षात घेऊनही ! एक हसताखेळता विद्वान अचानक निघून गेला.

■

**भाषेचे पैलू**

भाषा ही मानवी जीवनातील संप्रेषणाचे महत्त्वाचे साधन आहे. जसजसे मानवी जीवन उत्क्रांत होत जाते तसतशी भाषाही अधिकाधिक सूक्ष्म तरल आणि व्यामिश्र होत जाते. म्हणूनच भाषेची कल्पना करणे म्हणजे ती बोलणाऱ्या व्यक्तींच्या किंवा व्यक्तिसमूहांच्या जीवनसरणीची कल्पना करणे ठरते. माणूस भाषा निर्माण करतो हे खरेच, पण भाषासुद्धा ऐरणीसारखी माणसाला घडवण्याच्या कार्यात आपली भूमिका बजावत असते. त्याच्या जडणघडणीत 'जग असे असे असते' या धर्तीचे जगाविषयीचे वस्तुनिष्ठ आकलन अनुस्यूत असते - एवढेच नव्हे, तर 'जग कसे असावे?' याविषयीचे मूल्याधिष्ठित आकलनही समाविष्ट असते. आपल्या भावभावना, वृत्ती-प्रवृत्ती, आशा-आकांक्षा, भूमिका, पवित्रा, नीतिकल्पना तसेच अभिरुचीचे मानदंड इ०मधून जगाविषयीच्या माणसाच्या कल्पना आकाराला येतात, त्यात भाषेने घडविलेल्या संकल्पनांचा आणि त्यामागील वैचारिक कोटींचाही महत्त्वाचा वाटा असतो. तेव्हा जगात घडणाऱ्या घटनांचे, तथ्यांचे वर्णन करणे हाच भाषेचा एकमेव वापर नव्हे.

गौरी भागवत, 'मोदी यांचे तर्कशास्त्र!', लोकसत्ता, ३० जुलै २०१३

# तळागाळातले संस्कृत

- 'परण्या निघणे'मधल्या 'परण्या'चं मूळ संस्कृतमधल्या 'परिणय'मध्ये शोधणाऱ्या शांताबाई...
- लग्नातल्या नवरानवरींना 'वसंगी' घेण्याच्या सोहळ्यातल्या वसंगीचं मूळ संस्कृतमधल्या 'उत्संगी'मध्ये शोधणाऱ्या शांताबाई...
- ''दाराला 'आगळ' घातलीत का बघा'' असं विचारण्यातल्या 'आगळ'चं मूळ संस्कृतमधल्या 'अर्गला'मध्ये शोधणाऱ्या शांताबाई...
- भाकरीचं पीठ मळण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या लाकडी परातीला 'काठवट' म्हणतात, त्या काठवटीचं मूळ संस्कृतमधल्या 'काष्ठवाटी'मध्ये शोधणाऱ्या शांताबाई...
- क्षुद्र, मत्सरी स्वभावाच्या नातेवाइकाचं वर्णन आजी जे शब्द योजून करी, त्या ''लई 'इसाळू' आहे मेला!'' ह्या वाक्यातल्या 'इसाळू'चं मूळ संस्कृतमधल्या 'ईर्ष्यालु'मध्ये शोधणाऱ्या शांताबाई...
- हीच आजी धाकट्या, व्रात्य मामाला ''मोठं 'इधोशी' कारटं'' म्हणायची, त्या 'इधोशी'चं मूळ संस्कृतमधल्या 'विध्वंसी'मध्ये शोधणाऱ्या शांताबाई...
- जेवणं झाल्यावर उष्टीखरकटी आटोपली की आजी 'भुईसरा' घेऊन टाकायला सांगायची, त्या 'भुईसरा'तल्या (भुईसरा म्हणजे शेणानं जमीन सारवणं) भुईचं मूळ संस्कृतमधल्या 'भूमी'त शोधणाऱ्या शांताबाई...
- अंगावर उमटलेल्या फोडांना आजी 'पिटकी' म्हणे, त्या 'पिटकी'चं मूळ संस्कृतमधल्या 'पीटिका'मध्ये शोधणाऱ्या शांताबाई...

संस्कृतमधले अनेक तत्सम, तद्भव शब्द नागर मराठीनं अंगीकारले आहेत. पण त्याखेरीज कितीतरी संस्कृत शब्द, त्यांत नाना परिवर्तनं होत होत, भाषेच्या तळाशी झिरपत गेले आहे. ग्रामीण बोलीभाषेत ते इतके चपखल बसले आहेत की त्यांनाही आपली मूळची संस्कृत जातकुळी आता आठवत नसेल! शांताबाईंचं सारं लेखनच ओढ लावणारं. संस्कृतवरचं प्रेम तर अधिकच ओढ लावणारं. नक्की वाचलं पाहिजे असं वाटणारा हा लेख पूर्वी आपल्या वाचनात आला असेलही, पण संग्रहात नसला तर ठेवला पाहिजे असं वाटलं म्हणून सोबत पाठवला आहे.

विजय पाध्ये



अनुक्रमणिका

शांता शेळके यांचा हा लेख फार सुंदर आहे. तो मी पूर्वी पाहिलेला नव्हता. तो कुठे प्रकाशित झाला होता याचा पूर्ण संदर्भ कळल्यास अधिक उपयोग होईल. लेख उपलब्ध करून दिल्याबद्दल आभार.

**माधव देशपांडे**

अलीकडेच त्यांचं 'निवडक शान्ता शेळके' ह्या नावाचं एक चांगलं ३१७ पानी पुस्तक माझ्या नजरेला पडलं अन मी ते अधाश्यासारखं वाचून काढलं. त्यात हा लेख मिळाला. ई-शब्दचर्चेमध्ये आपण प्रामुख्यानं शब्दांसंबंधानं चर्चा करतो, म्हणून शांताबाईंचा शब्दांविषयीचा हा लेख चर्चापीठाच्या सदस्यांना पाठवला. ज्या ज्या व्यक्तींना संस्कृत, प्राकृत भाषा, एकूण साहित्यप्रकार, कविता, गीतरचना, इंग्लिश वाङ्मय अशा वेगवेगळ्या प्रकारांमध्ये विशेष रुची असल्याचं मला ठाऊक आहे, त्यांच्यासाठी त्या पत्राची प्रत पाठवून दिली.

नागर भाषांतल्या शब्दांचं मूळ संस्कृतमध्ये शोधण्याचा प्रयत्न अनेकजण अनेक माध्यमांतून अधूनमधून करत असतात. परंतु ग्रामीण किंवा बोली भाषांतील शब्दांत संस्कृत भाषेची मुळं शांताबाईंनीच अलगदपणे काढून आपल्यासमोर ठेवल्याचं मला दिसलं, म्हणून हा लेख मला विशेष भावला.

(जाता जाता गमतीचा एक भाग सांगतो. शांताबाईंच्याच एका पुस्तकात माटे मास्तरांनी त्यांना वर्गात शिकवत असताना एकदोन ग्रामीण शब्दांची मुळं संस्कृतमध्ये मिळतात, असं सांगितल्याचं मला वाचायला मिळालं होतं. एक शब्द म्हणजे भाकरी. बापूसाहेब माट्यांनी भाकरी हा शब्द मूळ भास्करीवरून तयार झाल्याचं सांगितलं. आकारानं मोठी असलेली ती भास्करी म्हणजे भाकरी नि तुलनेनं लहान ती चांदकी!)

**विजय पाध्ये**

लेख छानच आहे.

१. लेखाच्या अखेरीस त्यांचे शुद्धीकरण, उद्धार मात्र कुणी करू नये असे वाक्य आहे. तसं केलं तर नेमकं काय होईल? प्रस्तुत तद्भव शब्दाचा समर्थ पर्याय अर्थातच तो असणार नाही. तर त्याला पांडित्यपूर्ण (erudite), साहित्यिक (literary), humorous (विनोदी) असे वेगवेगळे लेबल मिळतील. एरवी ते लेबल अनौपचारिक, शिवराळ, ग्रामीण असे काहीही असू शकतील. (इथे लेबल ही शब्दकोशरचनेतील तांत्रिक संज्ञा म्हणून वापरली आहे.) काळाच्या ओघात तद्भवीकरण होताना शब्दांत केवळ ध्वनिपरिवर्तन न होता त्यांचे लेबलही बदलत असतात. अर्थ आणि अर्थच्छटा याही बदलत असतातच पण अनेकदा पूर्णपणे अर्थ बदललेला नसतो. त्यावेळेस त्याचे लेबल मात्र बदललेले असते. संरचनात्मक भाषाविज्ञानाच्या परिभाषेत् सांगायचे तर प्रत्येक भाषिक व्यवस्था ही जशी तद्विशिष्ट

ध्वनिव्यवस्था निर्माण करत असते तसेच ही लेबलव्यवस्था ही भाषा आणि बऱ्याचदा बोलीबोलीतूनही बदलत असतेच.

२. मराठी शब्दकोशांत काही ठिकाणी असे लेबल दिलेले असतात. पण नेमके किती लेबल आपण मराठीत वापरतो, किती आजवर कोशकारांनी हेरले आहेत, यावर सुशान्त देवळेकर आणि इतरांनी प्रकाश टाकावा. तसेच पाणिनी प्रहासे इ० लेबल प्रसंगानुरूप सांगतो पण शब्दकोश (मोनियर विल्यम्स, आपटे इ०) मात्र हे लेबल दाखवतात असे काही माझ्या पाहण्यात नाही. जाता जाता उल्लेख करतही असतील पण शब्दकोशाची एक शिस्त म्हणून विशिष्ट ठिकाणी कंसात इ० लेबल देणे असा सोपस्कार नाही. यावर अर्थातच माधव देशपांड्यांनी प्रकाश टाकावा.

३. OALD मधील लेबल इथे पाहा:
http://oald8.oxfordlearnersdictionaries.com/labels.html

**चिन्मय धारुरकर**

शांताबाईंचा लेख चांगला आहे. चर्चाही चांगली रंगते आहे. पण पुढील धागा वेगळा आहे.

कोशांमधील लेबल-व्यवस्था : चिन्मयने उल्लेखिलेल्या लेबलांना 'शैलीनिष्ठ कोटी/वर्ग' म्हणता येईल. ('ते एक लेबल; ती अनेक लेबले'. 'टेबल-टेबले' या धर्तीवर!)

निजभाषेच्या बाबतीत आपल्याला शब्दांच्या या प्रकारच्या वापराचे ज्ञान सहजपणे प्राप्त होत असते. परभाषेच्या बाबतीत मात्र या बाबतीतली कोशकारांनी दिलेली माहिती फार उपयुक्त ठरते.

उदा० 'उल्लेखिलेल्या' हा वापर 'औपचारिक', तर 'सांगितलेल्या/म्हटलेल्या' हा वापर 'अनौपचारिक'.

'निजभाषा' हा शब्द 'तांत्रिक, भाषावैज्ञानिक'.

चिन्मयच्या वापरातला 'भारी' हा प्रयोग 'अनौपचारिक', 'स्तुतिपर' (approving)

या प्रकारची माहिती उपयुक्त आहे.

शब्दकोशाची शिस्त म्हणून या प्रकारचे वर्गीकरण उपलब्ध होण्यासाठी मराठी आणि संस्कृत या भाषांचे त्या अंगाने संशोधन होणे आवश्यक आहे.

**मिलिंद मालशे**

तळागाळातले संस्कृत याविषयी चालू असलेल्या चर्चेत मला काहीसं वेगळं मत मांडावसं वाटतं. विजयरावांनी 'ग्रामीण किंवा बोली भाषांतील शब्दांत संस्कृत भाषेची मुळं शांताबाईंनी आपल्या समोर ठेवल्याचं' म्हटलं आहे. मला जरा वेगळे वाटते. माझ्या मते भाकर हा शब्द येथील प्राकृत/बोली भाषेत फार पूर्वीपासूनच असावा. आर्यांनी संस्कृतचे श्रेष्ठत्व दाखवून देण्यासाठी भाकरीचा भास्कराशी संबंध जोडला असावा.

आर्य हे उत्तर ध्रुवीय प्रदेशातून आले. त्यांच्याआधी हजारो वर्षे दक्षिण भारतात तेथील संस्कृती नांदत होती. हा भाग जैववैविध्याच्या दृष्टीने आजही जगप्रसिद्ध आहे. आर्यांना जेवढ्या वनस्पती, पशु, पक्षी माहीत होते त्याच्या कैकपटींनी येथील मूळवासियांना माहीत होते, असणारच. त्यांचा व्यवहारात व बोलीभाषेतही वापर होत असणार. भाकरी, जी ज्वारीसारख्या तृणधान्यांपासून केली जाते अशा वरी, नाचणी, बाजरी इ० तृणधान्यांचा उगमही येथलाच. त्यामुळे ह्या सर्वांना, त्यांच्यापासून बनवलेल्या पदार्थांना बोली/प्राकृत भाषेमध्ये नावे असणारच. असे असताना दरवेळी संस्कृत मूळ का शोधायचे? असे करताना एक प्रकारे संस्कृतचे मराठी, प्राकृतवर श्रेष्ठत्व आपण लादून घेत नाही का? मग आज इंग्रजी, हिंदीचे मराठीवर आक्रमण होताना उगाच त्या भाषांच्या नावाने ओरड करण्यात काय अर्थ?

मुख्य म्हणजे संस्कृत>प्राकृत>मराठी असा प्रवास न समजता प्राकृत>मराठी व प्राकृत>संस्कृत असे दोन वेगळे मार्ग मानून विचार का करू नये?

मी एक सामान्य चिकित्सक (General practitioner) असून भाषाविज्ञानासंबंधी अनभिज्ञ आहे, केवळ मराठी अभिमानी म्हणून हे धाडसाचे विधान करत आहे हे जाणून तज्ज्ञांनी कृपया शंकानिरसन करावे.

**उमेश करंबेळकर**

न्हावी ह्या शब्दाचं मूळ 'स्नाना'त असल्याचं मीही वाचलं होतं. 'शब्दचर्चा' ह्याच नावाचा चारशे-सव्वाचारशे पानांचा ग्रंथ गेल्या वर्षी मेहता पब्लिशिंग हाउसनं प्रसिद्ध केला आहे, त्यात लेखक डॉ० म०बा० कुलकर्णी ह्यांनी न्हावी हा शब्द संस्कृत 'नहावी' (म्हणजे स्नान घालणारा) ह्या शब्दावरून आल्याचं नमूद केलं आहे. माझ्यापाशी उपलब्ध असलेल्या संस्कृत शब्दार्थकोशांमध्ये नहावी हा शब्द मिळाला नाही, त्यामुळे त्यासंबंधात मला फारसं काही बोलता येत नाही. मात्र कुलकर्ण्यांच्या त्या विधानाला पुष्टी देणारी आणखी माहिती कितीतरी आधीच मिळाली होती, ती म्हणजे पूर्वी न्हाव्यांकडे अंघोळ घालण्याचं कामही सोपवलेलं असायचं. त्यामुळे स्नान - न्हाण - न्हावी असा प्रवास करीत न्हावी शब्द बनला. ही नोंद नागपूरच्या मा०गो० वैद्यांच्या 'शब्दांच्या गाठीभेटी' ह्या कोशातही केलेली आहे.

**विजय पाध्ये**

संस्कृत भाषेत 'नहावी' असा शब्द नाही, तर 'स्नापक' असा शब्द आहे. हा शब्द प्राकृत/पालीमध्ये जाताना सृह् आणि पृव् असे बदल घडून येतात, व पालीमध्ये 'नहापक' आणि प्राकृतमध्ये 'नहावअ' असे शब्द दिसू लागतात. संस्कृतमध्ये ह्न, ह्म, ह्व सारखी हकारादि जोडव्यंजने प्राकृतात नियमाने व्यत्यय (क्रम उलटा होऊन) हकारान्त होतात. या प्रक्रियांमधून मराठी 'न्हावी' हा शब्द जन्माला आला आहे. त्याचा अर्थही या प्रवासात बदलला, आणि या शब्दाचा स्नानाशी असलेला शाब्दिक संबंधही विसरला गेला व पुन्हा नव्याने 'नापित', नाभिक' इत्यादी भ्रान्तसंस्कृत रूपे तयार केली गेली. असे एक भ्रान्तसंस्कृत रूप सध्या प्रचारात असलेल्या 'बागेश्री' या शब्दात दिसते. मूळ 'वागीश्वरी' यातून हा शब्द 'वागीसरी'>'बागीसरी'> या मार्गाने येऊन त्या 'सरी'चे भ्रान्तसंस्कृत 'श्री' केले गेले आणि 'वागी'ची 'बाग' होऊन ही श्री बागेत जाऊन बसली. बिहारमधले 'झा' हे आधुनिक आडनाव संस्कृत 'उपाध्याय' याची उवज्झाय>ओज्झाय>ओज्झा>झा या मार्गाने आले आहे, हे सांगितले तर विश्वास बसत नाही.

**माधव देशपांडे**

डॉ० करंबेळकर, तुमचा मुद्दा बरोबरच आहे. कुठल्याही शब्दासाठी संस्कृतातलं मूळ शोधून काढण्याचं कारण नाहीच; तसं केल्यानं संस्कृतला श्रेष्ठत्वाचा मान देत राहून आपल्या प्राकृत भाषांचं मोल कमी होऊ देता कामा नये, ह्या मताशी मी सहमत आहेच. तथापि, प्रस्तुत बाबतीत जी काही उदाहरणं शांताबाईंनी दिलेली आहेत त्यांचा अभ्यास केला तर ग्रामीण भागांतले वा प्राकृत भाषेतले जे शब्द शांताबाईंनी नमूद केले आहेत त्यांचं संस्कृतीकरण झालेलं वाटत नाही.

'भाकरी' हा शब्द मूळचा 'भास्करी' होता असं आपल्याला वर्गात शिकत असताना माटे मास्तरांनी सांगितलं' अशी टिपणी शांताबाईंच्या 'रंगरेषा' ह्या पुस्तकात मिळते. (कृ०पां० कुलकर्ण्यांनाही ते मान्य असल्याचं व्युत्पत्तिकोश दर्शवतो.) प्राचीन काळापासून लोक कुठल्या ना कुठल्या तरी धान्यापासून भाकरीसारखा पदार्थ करून खात असतील, पण त्याला भाकरीच म्हणत असतील असं म्हणता येणार नाही. मोठ्या आकाराची, धवल रंगाची, वाटोळी, थापलेली व सतत, सहज दिसत असलेली, वापरातली वस्तू म्हणून भास्करी असा शब्द संस्कृतमध्ये रूढ असू शकेल, नि त्याचं प्राकृत रूप भाकरी होणं शक्य आहे. सूर्याच्या आकारापेक्षा खूपच लहान असणारी, परंतु त्याच उपयोगासाठी तयार केली जाणारी खाद्यवस्तू म्हणजे चांदकी. चंद्रासारखी दिसणारी ती चांदकी. (चांदकीचं मूळ माटे काय किंवा इतर कुणीही, चंद्रिकेमध्ये शोधल्याचं माझ्या वाचनात आलेलं नाही!)

कितीतरी प्राकृत शब्दांची संस्कृतीकरण होऊन ती तशी रूपे रूढ झाली आहेत हे खरं आहे, परंतु आपण प्राकृत शब्द आणि संस्कृतीकरण होऊन रूढ झालेली रूपं अशी वापरत राहूनच दोन्हींचा सारखाच आदर राखू शकू. आपल्या हातात तेवढंच आहे!

**विजय पाध्ये**

लहान भाकरीला वापरलेला चांदकी हा शब्द पाहाता भाकरीचा भास्करीशी संबंध असणे ही कल्पना निर्माण होणे स्वाभाविक वाटते. परंतु 'चंद्रक' किंवा 'भास्करी' असे शब्द खाण्याच्या पदार्थांना उद्देशून संस्कृतात वापरात असल्याचा पुरावा उपलब्ध संस्कृत वाङ्मयात माझ्या पाहाण्यात नाही. चांदकी आणि भाकरी हे शब्द जरी तद्भव असले तरी त्यांचा जन्म प्राकृत/अपभ्रंशातच झाला असावा. 'आर्यांनी भाकरीचा भास्करीशी संबंध जोडला' याला तर काहीच आधार नाही, कारण भाकरीचा भास्करीशी संबंध कुठल्याच संस्कृत ग्रंथात नसून त्याचा उगम शांताबाईंच्या शिक्षकांच्या कल्पनाशक्तीत आहे. प्रत्येक तद्भव प्राकृत शब्दाचा उगम त्याच अर्थाच्या पूर्वी वापरात असलेल्या संस्कृत शब्दात आहे असे मानण्याचे काही कारण नाही. प्राकृतभाषांना त्यांची स्वत:ची सर्जनशीलता होती. याचा प्रत्यय पाली/प्राकृत वाङ्मय वाचताना येतो. कित्येक पाली/प्राकृत तद्भव शब्दांच्या जागी जर संस्कृत शब्द ठेवले तर असे दिसते की त्या संस्कृत शब्दांतून तोच अर्थ व्यक्त होत नाही. याचा अर्थ प्रत्येक प्राकृत भाषेने तद्भव शब्द नव्या अर्थाने वापरायला सुरुवात केली आहे, व नवीन तद्भव शब्द तयार केले आहेत. उदाहरणार्थ मराठी न्हावी हा शब्द ऐतिहासिक दृष्टीने पाहाता पाली नहापक आणि संस्कृत स्नापक याच्याशी संलग्न आहे. परंतु या शब्दांचे अर्थ बदलत गेले, आणि त्यामुळे न्हावी याचे कल्पित संस्कृत मूळ नापित असे होऊन ते वापरात आले. मराठीनेही तद्भव/तत्सम शब्द नवीन अर्थाने वापरायला सुरुवात केली. 'दूरध्वनी' आणि 'भ्रमणध्वनी' हे आजचे मराठी शब्द जरी तत्सम असले तरी कोणत्याही संस्कृत वापरातून आलेले नाहीत, तर पूर्णत: नव्याने वापरात आणलेले आहेत.

**माधव देशपांडे**

**ह्या चर्चेत सहभागी झालेल्या व्यक्तींचे ई-पत्ते पुढीलप्रमाणे :**


करंबेळकर, उमेश umeshkarambelkar@yahoo.co.in

देशपांडे, माधव mmdesh@umich.edu

धारुरकर, चिन्मय chinmayvijay@gmail.com

पाध्ये, विजय v.wordsmith@gmail.com

मालशे, मिलिंद milindmalsheg@gmail.com


■

# आरोग्यविद्या डॉट नेट

सुशान्त शंकर देवळेकर

'चांगली कामे करीत शंभर वर्षे जगण्याची हौस धर' हे आरोग्यसूत्र ईशावास्याच्या ऋषीने हजारो वर्षांपूर्वी सांगितले. इसवी सन दोन हजार येईल-जाईल, नवे शतकही येईल. देशाचा एक हिस्सा जरी नवशतकात अधिकाराने प्रवेश करील. स्कायस्क्रेपर्स, सायबरस्पेस, मुक्त-अर्थव्यवस्था, व्यक्तिस्वातंत्र्य, इ० तरी त्याच वेळी दुसरा हिस्सा-दुसरा देशच जणू-इडापिडांशी झगडत असेल, पडकी घरे. फुफाटा, कशाबशा शाळा, सांडपाण्याची डबकी, उघड्या हागंदऱ्या, अस्मानी-सुलतानीच्या फेऱ्यात शेतकरी, पण राजकारणी गुंडांच्या ताब्यात सर्व जातिबद्ध. एकविसाव्या शतकात जाऊ पाहाणाऱ्यांना शेष भारताचा रामराम. भेटू कधीतरी.

'भारतात' अजूनही शेकडा सत्तर माउल्या फक्त शेजारणीच्या भरवशावर बाळंतवेणा सोसतात, त्याही बहुतेक रात्रीच्या अंधारात. आषाढ-श्रावणाच्या पाऊसपाण्यात, विजेच्या लपंडावात. शेकडा पासष्ट बाळे, अर्धपोटी खुरटलेली, दीनवाणी जगतात. शेकडा बहुतेक दुखणाईत औषध म्हणून पाणी टोचून घेतात. त्यासाठी घामाचा दाम मोजतात. प्रसंगी बैल बकऱ्या विकतात. कर्जे काढतात. इथे थंडीताप असो, ओटीपोटात दुखणे असो, की पोटात बैलाचे शिंग घुसो, रानावस्तीतून फाट्यापर्यंत, फाट्यापासून तालुक्यापर्यंत, तिथून आणखी कुठपर्यंतही वणवण केल्याशिवाय इलाज नाही. दम असेतोपर्यंत वणवण करूनही खरा विद्यावान, दयावान डॉक्टर भेटेल, याचा भरवसा नाही. दुखण्याची सुटी, रजा, वेतन, विमा, सवलत वगैरे सोडा, दयेचा शब्दही दुर्मीळ आहे. आकडे-सरासरीच्या खेळात इथले दु:ख मावणे कठीण आहे. अशा लाखो-करोडो मायबाप, भाऊबहिणी, पोराबाळांना, आजच्या-उद्याच्या नागरिकांना, एकविसाव्या शतकात, निदान या महाराष्ट्रातल्या गावागावात प्राथमिक का म्हणाना, पण शास्त्रीय वैद्यकसेवा मिळावी म्हणून, तसेच अशा लाखोकरोडोंना सुचेल तसा बरावाईट सल्ला-इलाज करणाऱ्या हजारो प्रामाणिक विद्यार्थी भारतवैद्यांना आणि जिज्ञासूंना साध्या सोप्या मराठीत थोडी तरी शास्त्र-विद्या समजावी, म्हणून हे 'भारतवैद्यक' अर्पण.'

डॉ० श्याम अष्टेकर आणि डॉ० रत्ना अष्टेकर ह्यांच्या आरोग्यविद्या डॉट नेट (www.arogyavidya.net) ह्या संकेतस्थळाची ही अर्पणपत्रिका आहे. हे संकेतस्थळ म्हणजे उपरोक्त डॉक्टर उभयतांनी लिहिलेल्या 'भारतवैद्यक' ह्या ग्रंथाची संगणकीय आवृत्ती आहे. ग्रंथाचे भारतवैद्यक हे नाव शेतकरी संघटनेच्या शरद जोशी ह्यांनी मांडलेल्या भारत

आणि इंडिया ह्या द्वैतावरून स्फुरलेले आहे.

'आरोग्य, वैद्यकीय माहितीच्या प्रसारामुळे एकूण आरोग्य आणि आरोग्य व्यवस्था सुधारतात, आजारांचा प्रतिबंध होऊ शकतो. बराच वेळ व खर्च वाचतो आणि ग्राहक हक्कांचे संरक्षण होऊ शकते.' ह्या भूमिकेतून लेखकांनी हे पुस्तक लिहिल्याने विविध आजार/रोग ह्यांविषयी माहिती दिलेली आहेच; पण आरोग्यविषयक सामाजिक सवयी, घरगुती हिंसाचार, देशोदेशीच्या आरोग्यव्यवस्था, सामाजिक आणि आर्थिक प्रश्न ह्यांविषयीही माहिती दिलेली आहे.

विषय समजावून सांगायला साहाय्य करणारी सुमारे हजारभर छायाचित्रे तसेच साठएक चलचित्रे संकेतस्थळावर घातली आहेत. ह्या संकेतस्थळाचे सर्वांत महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे रोगनिदानाचे संवादी पद्धतीने मांडलेले तक्ते. आजाराविषयीच्या प्रश्नावलीतील पर्यायांतून आपल्याला होत असलेल्या त्रासाची नेमकी माहिती वापरकरी पुरवतात आणि त्यांना आपल्या आजाराचे प्राथमिक निदान सापडते.

संकेतस्थळावरील मराठी भाषा शक्य तितकी सोपी आहे. अचूक संज्ञा देण्यासाठी विचार केलेला आहे. उदा० रक्तक्षय ही रूढ संज्ञा कशी दिशाभूल करू शकते स्पष्ट करून रक्तपांढरी ही संज्ञा संकेतस्थळावर वापरली आहे.

आधुनिक वैद्यकशास्त्रासोबतच आयुर्वेद, होमियोपॅथी ह्या उपचारपद्धतींतील उपचारांची माहितीही उपयुक्तता आणि मर्यादा ह्यांचे भान बाळगून दिलेली आहे. एखाद्या आजारावर कोणत्या उपचारपद्धतीने उपचार स्वस्तातले आहेत ह्याचीही माहिती काही ठिकाणी दिलेली आढळते.

संकेतस्थळावरील माहिती युनिकोड संकेतप्रणालीत टंकलेली असल्याने शोधणे सोपे असून दुव्यांद्वारे एका माहितीकडून दुसऱ्या माहितीकडे वाचकांना नेण्याची सोय बरीच चांगली आहे. संकेतस्थळावरील मराठी मजकूर टंकताना मात्र चुका झालेल्या आहेत, त्या दुरुस्त करून पुढील माहितीचे टंकन निर्दोष होईल इकडे निर्मात्यांनी लक्ष देणे गरजेचे आहे.

मुखपृष्ठावर अर्थसाहाय्यासाठी केलेल्या आवाहनात संकेतस्थळ टिकावे, अद्ययावत राहावे ह्यासाठी वर्षाला सुमारे लाखभर रुपये खर्च येतो असे म्हटले आहे. ही रक्कम वास्तवतेपेक्षा जास्त वाटते व ह्यापेक्षा बऱ्याच कमी खर्चात संकेतस्थळ चालवता येईल असे वाटते. ह्या क्षेत्रातील तज्ज्ञांनी ह्या संकेतस्थळाला साहाय्य करायला हवे.

■





अनुक्रमणिका

पुस्तक-परीक्षण

# उद्बोधन आणि करमणूक

प्र० ना० परांजपे

[ परीक्षित ग्रंथ : 'सुभाषित रत्नभाण्डागार (सामान्यनीति प्रकरण)' अनु० सरोजा भाटे, प्रकाशक-केशव भिकाजी ढवळे, मुंबई, २०१३, पृष्ठसंख्या १९८, किंमत रु० २०० ]

सुभाषित म्हणजे चांगला बोल. कोणत्याही विषयावरील चिंतनाचे सार कमीत कमी शब्दांत जास्तीत जास्त रंजक शैलीने व्यक्त करणारी रचना म्हणजे सु-भाषित. त्यांचे बहुतेक कर्ते अनामिक आहेत. जात्यावरच्या ओव्या किंवा रहाटावरच्या गाण्यांप्रमाणे सुभाषिते म्हणजे वर्षानुवर्षे वाहात आलेल्या लोकसंस्कृतीच्या गंगेची धारा. अनुभवातून उमगलेली, चिंतनातून प्रकटलेली दोन किंवा चार चरणांची कवने. त्यांना कुठलाही विषय वर्ज्य नाही. व्यवहार, नीतिमत्ता-राजकारणापासून अध्यात्मापर्यंतच्या कोणत्याही विषयाची मर्मदृष्टी सुभाषिते व्यक्त करतात. काही वेळा परस्परविरुद्ध टोकाचे विचारही ती मांडतात. ज्याला जो विचार सोयीचा वाटेल तो त्याने उचलावा! वक्तृत्वात, निबंधलेखनात परिणामकारकतेसाठी, मुद्याच्या पुष्टीसाठी किंवा खंडनासाठी सुभाषिते उपयोगी पडतात. त्यामुळेच पूर्वी संस्कृतच्या शालेय पाठ्यपुस्तकांत सुभाषितांचा आवर्जून समावेश केला जाई. पालक आणि शिक्षक विद्यार्थ्यांकडून ती पाठ करून घेत.

तत्त्व आणि उदाहरण किंवा आधी उदाहरण आणि मग तत्त्व अशी सुभाषिताची रचना सर्वसाधारणपणे असते. उपमा, रूपक, विरोधाभासासारखे अर्थालंकार, अनुप्रासासारखे शब्दालंकार, रमणीय अल्पाक्षरत्व, प्रासादिकता अशी वैशिष्ट्ये सुभाषितांत आढळतात. त्यामुळे पूर्वी भाषाशिक्षणात सुभाषितांना महत्त्वाचे स्थान असे. पण संस्कृतबरोबरच सुभाषितेही आता शालेय शिक्षणातून आणि घरगुती संस्कारांतून हद्दपार होत आहेत. त्यामुळे प्रस्तुत पुस्तकाचे स्वागत करायला हवे.

कै० काशिनाथ पांडुरंग परब यांनी विषयवार वर्गीकरण करून सुभाषिताचे संकलन करून एक संग्रह प्रसिद्ध केला. त्यात एकूण सहा प्रकरणे असून प्रत्येक प्रकरणात सरासरी हजार ते दीड हजार सुभाषितांचा समावेश आहे. त्यातील राजप्रकरणात 'सामान्यनीति हे शेवटचे उपप्रकरण असून त्यात एकूण १०५८ सुभाषिते आहेत. त्या सर्व सुभाषितांचा डॉ० सरोजा भाटे यांनी सरस आणि सुबोध गद्य अनुवाद केला असून त्या अनुवादासह ती १०५८ सुभाषिते या पुस्तकात संग्रहित करण्यात आली आहेत. अनुक्रमणिकेत सुभाषितांचा क्रम अकारविल्हे ठेवण्यात आलेला आहे. त्यामुळे सुभाषित शोधणे सोपे

झाले आहे. संग्रहातील काही सुभाषिते सध्याच्या स्त्रीविषयक धारणेच्या विरोधी असल्यामुळे काही स्त्रीवादी वाचकांना राग येण्याचा संभव आहे. काही सुभाषितांवर अश्लीलतेचा आरोप होण्याचाही संभव आहे. पण हा संग्रह प्रथम प्रसिद्ध झाला तो काळ लक्षात घेता ते क्षम्य मानता येईल.

वक्तृत्वाची तयारी करणारे स्पर्धक, निबंध-लेखनाचा अभ्यास करणारे विद्यार्थी आणि कुतूहल जागे असणारे वाचक या सर्वांच्या दृष्टीने 'सुभाषित रत्नभाण्डागार' हा संग्रह अतिशय उपयुक्त आहे.

■

## 'ई-बुक'ची दुनियादारी

आजच्या तरुण वाचक मंडळींना ऑनलाइन पुस्तकं वाचायला आवडतात. आपल्या संगणकावर, फोनवर किंवा इतर गॅजेट्सवर 'ई-बुक' डाउनलोड करण्याकडे त्यांचा जास्त कल आहे. काल्पनिक किंवा वास्तववादी या दोन्ही प्रकारांमधील पुस्तके डिजिटल स्वरूपात उपलब्ध असतील, तर त्याकडे तरुण वर्ग ताबडतोब आकर्षित होतो आणि त्यामुळे 'ई-बुक्स'ची तडाखेबंद विक्री होत आहे. त्यामुळेच मोठे प्रकाशक आणि पुस्तक विक्रेत्यांनी मोठ्या प्रमाणात 'ई-बुक्स' तयार करण्याच्या दिशेने पावलं टाकायला सुरुवात केली आहे.

'फिक्की'च्या अहवालानुसार भारतातील वाचकांची संख्या सुमारे सहा कोटी आहे. सिमॉन आणि शुश्टर इंडिया मार्केटिंग विभागाचे संचालक राहुल श्रीवास्तव यांनी दिलेल्या माहितीनुसार जगातील दहा देशांमध्ये केलेल्या सर्वेमध्ये असे आढळून आले आहे, की भारतात सर्वात जास्त 'ई-बुक्स' डाउनलोड करण्यात येतात. डिजिटाइज्ड पुस्तक वाचण्याचा नवा ट्रेंड भारतातील तरुणाईने चांगलाच आपलासा केला आहे. हजारो वर्षांपासून भारतात विविध बारा भाषांमध्ये उत्तमोत्तम नाटके, काव्य, कादंबऱ्या असे साहित्य निर्माण होत आले आहे. प्रत्येक भागातील साहित्याला स्वतःचे असे एक वैशिष्ट्य आहे. दुर्दैवाने हे साहित्य ऑनलाइन आलेले नाही आणि येणे कठीणही आहे. भारतात आधुनिक टेक्नॉलॉजी उपलब्ध आहे; पण मुळात भारतातील अभिरुचीपूर्ण साहित्य 'ई-बुक' स्वरूपात उपलब्ध नाही. ही गोष्ट लक्षात घेऊन जास्तीत जास्त साहित्य 'ई-बुक' स्वरूपात आणण्यासाठी प्रकाशक प्रयत्न करीत आहेत.

महाराष्ट्र टाइम्स, १९ ऑगस्ट २०१३





अनुक्रमणिका

# ‘जर्मन शिका’ : एक आदर्श वस्तुपाठ

चिन्मय धारूरकर

[ **परीक्षित पुस्तक :** ‘जर्मन शिका’, बिनीवाले अविनाश, नितीन प्रकाशन, पुणे, २००९, पृष्ठसंख्या २८२, किंमत रु० १५०/-]

२००० साली अविनाश बिनीवाले यांच्या ‘जर्मन शिका’ची पहिली आवृत्ती आली होती आणि गेल्या बारा वर्षांत या पुस्तकाच्या सहा आवृत्त्या बाजारात आल्या आहेत. हे विलक्षण व्यावसायिक यश म्हणायला हवे. मुख्य म्हणजे केवळ व्यावसायिक असे हे यश या पुस्तकाच्या विषयाचे नसून त्याच्या रसाळ, सविस्तर, सुबोध मांडणीचेही आहेच.

**१. भाषा-अध्यापनाची व्याकरणनिष्ठ तत्त्वे**

**१.१ व्याकरणांशांचा क्रम**

कोणता व्याकरणांश कोणत्या पायरीला हाताळावा, आधी कोणत्या गोष्टी सांगून, शिकवून वाचकाला सज्ज करावे जेणेकरून क्रमवारे पुढे येणारे अंश समजायला सोपे होईल याला ढोबळपणे भाषा अध्यापनाची व्याकरणनिष्ठ तत्त्वे म्हणतात. याबाबतीत या पुस्तकातील प्रकरणांचा क्रम विचारपूर्वक ठरवलेला आहे. उदा० पहिले प्रकरण हे वर्णमाला, उच्चार आणि आघात यांबाबत आहे. दुसरे प्रकरण जर्मनमध्ये ‘होय, नाही’ कसे म्हणावे ते शिकवणारे आहे. तिसरे काय, कधी, कुठे, कोणाला, कशासाठी’ अशा प्रश्नार्थक सर्वनामांची ओळख करून देणारे आहे. चौथे मी, तू इ० व्यक्तिवाचक सर्वनामांचा परिचय करून देणारे आहे. पाचवे नामांची ओळख करून देते. सहावे विभक्ती आणि वाक्यविचार यांबद्दल आहे. सातवे व्यक्तिवाचक सर्वनामांच्या विभक्तीबद्दल आहे. आठवे संबंधवाचक सर्वनामे आणि विशेषणे याबद्दल आहे. अशा प्रकारे वाचकाला, विद्यार्थ्याला सज्ज करून नवव्या प्रकरणापासून क्रियापद, त्याची वेगवेगळ्या काळातील त्याची रूपे, अनियमित क्रियापदे यांचा सविस्तर परिचय ९ ते २३ अशा चौदा प्रकरणांमधून करून दिलेला आहे. पुढील प्रकरणे ही क्रियाविशेषण, समास, कर्मणी प्रयोग इ०विषयी आहेत.

अशा प्रकारच्या टप्प्याटप्प्याने भाषेची ओळख करून दिलेली असल्याने विद्यार्थ्याला ‘हे काय मध्येच सांगत आहेत’ असे कोठेही वाटत नाही. शिवाय प्रत्येक प्रकरणात त्या त्या व्याकरणांशाची तुलना मराठीशी (तसेच हिंदी, गुजराती, रशियाई, इंग्रजी आणि क्वचितप्रसंगी संस्कृतशी) केलेली आहे. त्यामुळे मराठीच्या प्रभावातले आपल्याला या भाषेसाठी काय टाळायचे आहे याची उत्तम कल्पना अभ्यास करताना येते. उदाहरणार्थ

- मराठी, हिंदी, गुजराती वगैरे भाषांमध्ये कर्मणी रचना म्हणजे विशेष नाही. कारण ह्या भाषांमध्ये सकर्मक क्रियापदांपासून भूतकाळात नेहमीच कर्मणी रचना करत असतो, कारण मराठी, हिंदी वगैरे भाषांमध्ये [ भूतकाळात सकर्मक क्रियापदांसाठी ] कर्तरी रचना अस्तित्वातच नाही! ( *'त्यानं पुस्तक वाचलं'* असा प्रयोग होतो; पण *'तो पुस्तक वाचला', 'ती पुस्तक वाचली', 'गुरुजी पुस्तक वाचले', 'तो लाडू खाल्ला', 'ती लाडू खाल्ली', 'आम्ही दूध प्यायलो', 'कुंदा, तू दूध प्यायलीस का?', 'नंदा, तू गहू आणलीसे का?',* अशी कर्तरी वाक्यं होत नाहीत. महाराष्ट्र-कर्नाटकाच्या सीमाप्रदेशात कन्नड भाषेच्या प्रभावामुळे कन्नड भाषेत कर्तरी वाक्यं होत असल्यामुळे अशी वाक्यं सरसकट केली जातात. परंतु ही वाक्यं प्रमाण मराठीचा विचार करता चुकीची आहेत.) जर्मन भाषेत मात्र कर्तरी रचना नेहमीच शक्य असते, त्यामुळे कर्मणी रचनेचा अभ्यास महत्त्वाचा ठरतो. अर्थात कर्मणी रचनेसाठी एक महत्त्वाची अट अशी की त्या वाक्यात कर्म असलं पाहिजे म्हणजे क्रियापद सकर्मक हवं. ह्या बाबतीत संस्कृत भाषेचं एक वेगळं वैशिष्ट्य आहे, इतर भाषांमध्ये असलेली अकर्मक क्रियापदं संस्कृत भाषेत सकर्मक असतात! म्हणूनच संस्कृत भाषेत - तेन गृहं गम्यते । शाला मया गम्यते ।' अशी वाक्यं होऊ शकतात; पण इंग्लिश भाषेत He goes home ह्याचं The home is gone by him किंवा अशा तऱ्हेचं चमत्कारिक कर्मणी वाक्यं होऊ शकत नाही! (पृ० २६३).

त्याचप्रमाणे, मराठीच्या अंगाने जर्मनचा विचार केलेला आहे आणि मराठी उच्चार जर्मन लिपीव्यवस्थेतून कसे व्यक्त करावेत याबद्दल पहिल्या प्रकरणातील विवेचन मार्गदर्शक ठरते. उदा० चिन्मय हे नाव आपण इंग्रजी Chinmay असे करत असलो तरी जर्मनमध्ये y हे अक्षर नाही आणि chचा उच्चारच होत नाही. अशा वेळी या पुस्तकात जर्मनमुखातून आपल्या नावाचा योग्य उच्चार काढून घेण्यासाठी जर्मन धाटणीने त्याचे स्पेलिंग Tschinmaj असे करावे लागेल याबाबतचे मार्गदर्शन मिळते.

**१.२ अध्यापननिष्ठ व्याकरण**

भाषेचे व्याकरण हे एक प्रकारे तिचे वर्णनच असते. भाषावैज्ञानिकांना आणि भाषेच्या अभ्यासकांना भाषांची अशी वर्णने भाषिक संशोधनासाठी लागत असतात. त्यांना वर्णनात्मक व्याकरण असे म्हणतात. भाषा शिकवण्यासाठी मात्र अध्यापननिष्ठ व्याकरण अनुसरणे अगत्याचे असते. त्यातही एका विशिष्ट भाषकसमूहासाठी (येथे मराठी) जेव्हा दुसरी भाषा शिकवायची असते (येथे जर्मन) तेव्हा या दोन भाषांमधला विरोध, फरक अधोरेखित करून नव्या भाषेची व्यवस्थित ओळख संरचनात्मक पातळीवर करून द्यावयाची असते; यालाच त्या भाषेचा पाया म्हणता येईल. नवे शब्द किंवा वाक्य ही शिकवायची नसतात तर नव्या भाषेची संरचना कशी आहे हे समजले तर त्या भाषेचे तपशील शिकणे सहजशक्य होते. या पुस्तकात या गोष्टीचे भान पदोपदी बाळगलेले आहे

आणि आपल्यासमोर शिकण्याच्या दृष्टिकोनातून जर्मनच्या व्याकरणाचा उलगडा केलेल आहे.

**१.३ व्याकरण-भाषांतर पद्धतीचा संयत वापर**

पुस्तकाची धाटणी ही व्याकरणांश सादर करून त्याबाबतीतली जर्मन भाषेतील तथ्ये सांगून उदाहरणे देणे अशा प्रकारची आहे. नवीन भाषेचा परिचय व्याकरणांशांच्य माध्यमातून करून देणे आणि मागाहून आपल्या भाषेतील मजकुराचे भाषांतर या भाषेत करता येणे यासाठी व्याकरण-भाषांतर पद्धती भाषा अध्यापनात वापरली जाते. हल्ली मात्र डायरेक्ट मेथडची बरीच चलती आहे आणि जर्मन शिकवणाऱ्या प्रतिष्ठित संस्थांमधून याच पद्धतीचा अवलंब केला जातो. आपल्या भाषेचे किंवा एखाद्या भाषेच्या संरचनेचे अर्थात व्याकरणाचे ज्ञान असेल तर दुसऱ्या भाषेतील समांतर तथ्ये समजून घेणे सोपे जाते. त्यामुळे त्या भाषेचे वर्तन, वळण समजून घेणे लवकर शक्य होते आणि भाषेची ओळख झटपट व्हायला मदत होते. म्हणून डायरेक्ट मेथडचा कंटाळा येत असणाऱ्यांना हे पुस्तक म्हणजे संजीवनी ठरते. अर्थात डायरेक्ट किंवा केवळ व्याकरण भाषांतर पद्धती असे न राहता परिपूर्ण भाषा अध्यापनासाठी दोन्हींचा संयत वापर होणे हिताचे असते.

या पुस्तकात अगदी तंतोतंत ही पद्धत वापरलेली नसली तरी या पद्धतीच्या अंगाने हे पुस्तक जाणारे आहे. अर्थात यात भाषांतरासाठी मजकूर दिलेले नाहीत की सरावासाठी किंवा सोडवायला काही अभ्यास दिलेला नाही; पण प्रत्येक जर्मन वाक्याखाली त्याचे नागरीत उच्चारण, त्याखाली शब्दाला शब्द लावून मराठी प्रतिशब्द आणि त्याखाली त्याचे मराठी वाक्यात भाषांतर असा क्रम पुस्तकभर पाळलेला आहे. यामुळे अगदी आरंभीच्या स्तरावरील विद्यार्थ्यालासुद्धा अचानक पुढच्या धड्यातील काही तपशील समजून घेणे सोयीचे झाले आहे. उदा०

Meenakschi kann wirklich gut schwimmen.

मीनाक्षी कान् विर्कलिश् गूट् श्विमन्.

मीनाक्षी शकते खरोखर चांगली पोहू.

मीनाक्षी खरोखरच चांगली पोहू शकते/मीनाक्षीला खरंच चांगलं पोहता येतं. (पृ० ८९)

**२. पानपूरके**

जवळजवळ प्रत्येक प्रकरणानंतर एक वेधक चौकट दिलेली आहे. केवळ पानपूरके म्हणून ही चौकट नसून त्यातून अभ्यासकाला जर्मन म्हणी, जर्मनीतील नद्या, पर्वत, तद्वाचक शब्द, जर्मन लिपी, भारतात झालेली जर्मन अध्यापनाची सुरुवात यांबद्दल सुरस

माहिती आणि मर्मदृष्टी मिळते. जर्मन शिकायचे नाहीये अशा कोण्या सामान्य माणसाने जरी डोळ्याखालून घातल्या तरी त्याला या भाषाभ्यासात रस निर्माण होईल अशी ही माहिती आकर्षक, रोचक, मर्मदृष्टिप्रद आहे. उदा० पान ११, ३१, ३९ वरील म्हणी असोत किंवा पान २६ वरील भारतात जर्मन विद्याभ्यासाचा शुभारंभ याबद्दलची थोडकी पण वेधक माहिती देणारी चौकट किंवा पान ५३वरील नद्यांची नावं ही चौकट असो किंवा पान ६६वरील अखंड जर्मनी ही जर्मनीच्या इतिहासाबद्दल वस्तुनिष्ठ पण मार्मिक माहिती देणारी चौकट असो अशा अनेक चौकटींनी हे पुस्तक खमंग बनवलेले आहे!

**३. मुखपृष्ठ, बांधणी इ०**

श्याम देशपांडे यांनी मुखपृष्ठ जर्मनीच्या झेंड्याचे रंग वापरून साकारलेले आहे. मधोमध अवतरणचिन्हात 'जर्मन शिका' अशी प्रेरणादायी आज्ञाच दिली आहे! कागदी बांधणीचं हे पुस्तक २८२ पानांचं आहे. कागदाचा दर्जा काही विशेष स्तुत्य नाही. परंतु. केवळ दीडशे रुपयात २८२ पानी पुस्तक देण्याच्या नादात कागदाच्या दर्जाच्या बाबतीत प्रकाशकांनी आखडते घेतल्याचे दिसते आहे. अर्थात शाळा, कॉलेजातले विद्यार्थी हे लक्ष्य ग्राहक लक्षात घेता किंमत वाजवी ठेवणे हेही अगत्याचे वाटले असणार! छपाई, टंक नेटके आहेत. मुख्य म्हणजे उच्चारासाठी विशेष लक्षपूर्वक कष्ट घेतलेले आहेत आणि पुस्तकभर उच्चार नेमकेपणाने आणि काटेकोरपणे दाखवलेले आहेत.

**४. उणेदुणे**

४.१ प्रत्येक प्रकरणानंतर जर सरावासाठी काही अभ्यास दिला असता आणि त्याची उत्तर बारीक टंकात अखेरीस परिशिष्ट करून जोडली असती तर एक पाठ्यपुस्तक म्हणून हे पुस्तक परिपूर्ण झाले असते. अर्थात शाळा-कॉलेजातील विद्यार्थी किंवा इतर लोक अन्य पुस्तकं वापरत आहेत, त्यात त्यांना सरावासाठी पुरेसा ऐवज मिळतो आहे आणि एक जोडपुस्तक म्हणून या पुस्तकाची कल्पना असेल तर सरावासाठी उदाहरणसंग्रह न देणे समजण्यासारखे आहे. पण एकूण पुस्तकाचा विस्तार बघता तसे असावे असे वाटत नाही. आणि अखेरीस सरावासाठी इंग्रज पुस्तकांवर अवलंबून राहायचे असेल तर मराठीतून जर्मन शिकवण्याचे काम अजून पूर्ण झालेले नाही असे म्हणावे लागेल.

४.२ आज घरोघरी संगणक, लॅपटॉप आणि कानोकानी मोबाईल झालेले आहेत. तेव्हा या पुस्तकातील सगळी वाक्ये जर एका जर्मन निजभाषकाच्या आवाजात ध्वनिमुद्रित करून दिली असती तर नवख्या विद्यार्थ्यांसाठी मोठी मदत झाली असती. एम्पी थ्री धारिका एखाद्या सीडीत टाकून देणे सहज शक्य आहे. विद्यार्थ्यांना जाता येता, आपल्या मोबाईल, एम्पीथ्री प्लेयरमध्ये टाकून या पाठ्यपुस्तकातील उदाहरणे, जर्मन वाक्ये ऐकता आली तर अभ्यासासाठी हे फार उपकारक होईल. अशा सीडीची जोड या पुस्तकाला मिळाली तर तो एक स्वयंपूर्ण पाठ्यक्रम होईल.





अनुक्रमणिका

## ५. समारोप

या जर्मन शिकवणाऱ्या पुस्तकानं मराठीतून इतर भाषा शिकवणाऱ्या पुस्तकांच्य लेखनासाठी आदर्श वस्तुपाठ निर्माण केला आहे. यालाच जोड म्हणून जर्मन-मराठ व्यवहारोपयोगी शब्दकोशही प्रसिद्ध झालेला आहे. तो नितीन प्रकाशनाने प्रकाशित केलेल आहे. आणि आरंभीच्या स्तरावरील अभ्यासकासाठी तो पुरेसा सविस्तर आहे. लवकरच बिनीवालेकृत जर्मन-मराठी आणि मराठी-जर्मन शब्दकोश साहित्यसंस्कृती मंडळ प्रकाशित करीत आहे. त्याच्या आगमनानंतर मराठीतून जर्मन शिकण्यासाठीच्या साहित्यात समृद्ध भर पडणार आहे. एकूण इतक्या सविस्तरपणे जर्मन शिकवणारं पुस्तक एखाद्या भारतीय भाषेत उपलब्ध असावं ही चांगली गोष्ट आहे. भारतीय भाषांतून परदेशी आणि अन्य भारतीय भाषा शिकवणारी अशी दर्जेदार पुस्तकं येणं आवश्यक आहे. लेखक आणि प्रकाशक यांचे या पुस्तकासाठी नक्कीच अभिनंदन केले पाहिजे. ■

---

मुखपृष्ठाविषयी

## न संपणारा प्रतिमाशोध

कलावंताच्या कल्पनाविश्वात कुठलेही 'एलिमेंट' खंक नसते. चित्रकल्पनेचा एखादा बिंदू, एखादी रेषा, एखादी छटा, एखादा पुसटसा आकारपण त्याच्यासाठी तितकाच श्रीमंत, प्रगल्भ आणि समृद्ध असतो. या सर्वाचा उपमर्द न करता, प्रतिष्ठेने मनातल्या मूळ कल्पनेशी प्रामाणिक राहून त्यांची संगती मांडणे आणि समर्थपणे व्यक्त होणे हे आव्हान असते. एखादी कल्पना, विचार हा सर्व अस्तित्वाला ग्रासून राहतो आणि या घुसमटीतून सुटकेचा प्रयत्न म्हणूनही चित्र जमते. विचार खेळकरही असू शकतो; पण सादरीकरणाची प्रक्रिया नेहमीच गंभीर असते. कलावंताच्या स्वतःच्या मूल्यांशी, घडणीशी आणि ताजेपणाशी कलाकृतीचे ताणेबाणे जोडलेले असतात.

अभिव्यक्तिस्वातंत्र्याचा आणि अमूर्ततेचा संबंध पूर्वापार जुळलेला आहे. आपल्या आध्यात्मिक स्वबरोबर एकाग्र होऊन मन निर्विकार करण्याचा प्रयत्न करताना सर्व बाह्य जग, वस्तुमात्र, व्यक्तिविशेष विरघळत जातात. तरी स्व सुटत नाही. आणि काही रेषा, आकार, ठसे उरतात आणि तेच त्या चित्रकाराला त्याचे स्वतःचे वेगळेपण दाखवतात.

चित्राची तार लागते आणि नव्या जाणिवांचे निःशब्द तरंग उमटू लागतात. दरवेळी निराळे, नादमय आणि लयदार. हे तरंगणारे निर्लेप तवंग-ऋतुमानानुसार, दिवसरात्रीच्या वेळेनुसार, मनःस्थितीनुसार वेगवेगळ्या प्रतिरूपांमध्ये सापेक्षरीत्या मनात, कागदावर, कॅनव्हासवर किंवा इतर माध्यमांतून अभिव्यक्त होत असतात. सलील वाघ यांची ही चित्रे या सतत रूप-आकार बदलणाऱ्या क्षणमात्र प्रतिरूपांचा, त्यांना उलगडलेल्या त्या संकेतांचा न संपणारा प्रतिमाशोध आहे.

**जयंत जोशी : चलभाष 097309 09496**

---

दखलयोग्य

# महाराष्ट्रातील संगणकसंस्कृती

लीना मेहेंदळे

## पुढील पिढीचे संगणकशिक्षण

पुढील पिढीला संगणक यावा ही शासनाची इच्छा आहे, त्यानुसार शाळांना संगणक देता यावेत असे सरकारचे प्रयत्न चालू आहेत. पण त्यात मराठी असावे हा आग्रह नाही. खरे तर सरकारने पहिलीपासून इंग्रजी शिक्षण सक्तीचे केले. हेतू हा की, मुलांना संगणक यावा, इंग्रजी यावे आणि त्यांच्यासाठी श्रीमंतीचे दार खुले व्हावे. 'श्रीमंती हवी असेल तर मराठी विसरा' ही नवी फॅशन आहे. त्यातच संगणकावर मराठी शिकणे अतिशय सोपे आहे हे माहीत नसल्याने शालेय संगणकशिक्षणाच्या धोरणांत मराठीचा कुठे आग्रह किंवा विचारच नाही. सरकारी आकडेवारीनुसार पहिलीपासून पाचवीत जाईपर्यंत पन्नास टक्के मुले गळतात, त्यांनी संगणकाचे स्वप्न पाहायचेच नाही का? एका प्रयोगात असे दिसते की संगणकावर मुलांना आधी मराठी शिकवले तर तो लेआउट सोपा असल्याने त्यावर बोटांना सवय झाली, की इंग्रजी शिकणे सोपे जाते. पण ते असो. मुद्दा हा की शालेय संगणकधोरणामध्ये मराठीचा विचार शून्य झालेला आहे.

आपल्याला आग्रह धरता येईल की, शासनात आलेल्या सर्वांना इन्स्क्रिप्ट लेआउट शिकणे आवश्यक ठरवावे, तरच त्यांना ती दृष्टी येऊ शकेल. तसेच हाही आग्रह धरावा लागेल की, शाळेतील मुलीमुलांना इन्स्क्रिप्ट लेआउटवर मराठी शिकवावे.

इंग्रजीऐवजी मातृभाषा वापरल्याने प्रगती होते का; याच्या उत्तरासाठी ही टक्केवारी पाहा-

| २००४ | साक्षरता | इंग्रजी साक्षरता | संगणक साक्षरता |
|---|---|---|---|
| भारत | ५२ | २५ | ०९ |
| चीन | ८८ | ११ | ५३ |

चीनची संगणक साक्षरता इंग्रजीसाठी अडून राहिली नाही.

इकडेही आता काकोडकर, नारळीकर, माशेलकर यांसारखे वैज्ञानिक सांगू लागलेत, की मराठीतून शिक्षण द्या; पण 'ते सोपे आहे' हेही सर्वांना सांगायला हवे.

**मराठी साहित्यकार कुठे आहेत?**

एका माहितीपत्रावरून असे दिसून येते, की सर्व भारतीय भाषा मिळून इंटरनेटवर टाकलेल्या पानांची संख्या एक कोटीच्याही खाली आहे. त्याच वेळी इंग्रजी भाषेत मात्र इंटरनेटवर उपलब्ध असलेल्या पानांची संख्या पद्म, महापद्म (इंग्लिश भाषेत सांगायचे तर ट्रिलियन्स ऑफ पेजेस) एवढी आहे.

तेव्हा भारतीय लेखकांनी थोड्याशा प्रयत्नाने मराठी लिपीचे टायपिंग शिकून महाजालावर (का याला इन्द्रजाल म्हणू या, कारण हेही किती मायावी!) धडाधड मराठी वाङ्मय उपलब्ध करून देण्याने आपल्या साहित्य संस्कृतीचे चांगले जतन होऊ शकेल.

मात्र सध्या असा जोरदार प्रचार चालू आहे की, लेखकहो, तुम्ही मराठी लिपीला फाटा द्या. त्या लिपीत टंकन करण्याचा आग्रह सोडा, आम्ही तुम्हांला अशी जादू शिकवतो की तुम्ही रोमन लिपीत टंकन करायचे व संगणक ते मराठीत उमटवेल, अशा रीतीने भारतीय लिप्यांची गरज संपेल. हा फोनेटिक पद्धतीचा ट्रॅप काही वर्षांपासून चालू आहे, याबाबतही वेळेवरच जागे व्हायला हवे, विशेषतः इन्स्क्रिप्ट सोपे आहे म्हणून...

**मराठी भाषा कुठे आहे?**

जगभरात मराठी किती बोलली जाते? एका आकडेवारीनुसार जगात बोलल्या जाणाऱ्या भाषा किती लोक बोलतात ती लोकसंख्या मोजली तर चिनी व इंग्रजीच्या खालोखाल हिंदीचा नंबर तिसरा, बंगालीचा सातवा आणि मराठीचा नंबर तेरावा. पण सर्व भारतीय भाषा एकत्र मोजल्या तर त्यांचा नंबर पहिला लागतो. हे जेवढे अभिमानाचे आहे, तेवढेच 'भाषा टिकवण्याची जबाबदारी उचला' असा संदेशही देणारे आहे. आज संगणक सर्वव्यापी झाला आहे. त्याच्या प्रवासाचा आढावा घेताना या जबाबदारीची जाणीव अंतर्मुख करणारी आहे.

शासनाने महाराष्ट्राचे सुवर्ण वर्ष साजरे करण्यासाठी जो कार्यक्रम केला आहे, त्यातही 'संगणक विकासात मराठी असावे' यासाठी कोणताही कार्यक्रम सुचवलेला नाही.

■

संदर्भ :

सांस्कृतिक महाराष्ट्र भाग १, संपा० मधु मंगेश कर्णिक, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई, २०११, पृ० ४८०-४८२ मधील काही निवडक भाग.

**१. भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण**

बडोदा येथील 'भाषासंशोधन आणि प्रकाशनकेंद्र' या स्वयंसेवी संस्थेच्या माध्यमातून डॉ० गणेश देवी यांच्या मार्गदर्शनाखाली भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण करणारा प्रकल्प नुकताच पूर्ण झाला आहे. या सर्वेक्षणातून मिळालेल्या माहितीच्या आधारे विविध राज्यांचे मिळून अनेक खंड तयार झाले आहेत.

**२. भाषाविज्ञान ऑलिम्पियाडमध्ये भारताला दोन पदके**

इंग्लंडमध्ये झालेल्या अकराव्या आंतरराष्ट्रीय भाषाविज्ञान ऑलिम्पियाडमध्ये भारताने एक रौप्य व एक कांस्य पदक पटकाविले आहे. भारतीय चमूतील यश सिन्हा याला रौप्य तर निलय सारडा याला कांस्य पदक मिळाले आहे. शालेय जीवनापासून विद्यार्थ्यांना भाषाविज्ञानाची ओळख व्हावी म्हणून मुंबई विद्यापीठाच्या भाषाविज्ञान विभागाने ऑलिम्पियाडसाठी पाणिनी भाषाविज्ञान ऑलिम्पियाड कार्यक्रमांतर्गत विद्यार्थी प्रशिक्षणासाठी विविध उपक्रमांचे आयोजन केले होते.

(संदर्भ : लोकसत्ता, ११ ऑगस्ट २०१३)

**३. 'पुष्पाचे प्राक्तन'चा विश्वविक्रम**

मिलिंद शिंत्रे (पुणे) यांनी 'प'च्या बाराखडीपासून सुरू होणाऱ्या १७५० शब्दांची अनुप्रास अलंकाराने युक्त 'पुष्पाचे प्राक्तन' ही कथा लिहिली आहे. रेकॉर्ड होल्डर्स रिपब्लिक, लंडन यांनी हा एक विश्वविक्रम असल्याची नोंद केली आहे. मिलिंद शिंत्रे यांच्या नावावर यापूर्वी सर्वात मोठे मराठी शब्दकोडे तयार करण्याची नोंद असून 'मराठीतील सर्व व्यंजनांचा समावेश असलेले सर्वांत लहान वाक्य' तयार करण्याचा विश्वविक्रमही त्यांच्या नावावर जमा आहे.

(संदर्भ : लोकसत्ता, १८ ऑगस्ट २०१३)

**वर्गणीदारांसाठी सूचना**

'भाषा आणि जीवन'ची वर्गणी ई-बँकिंग सुविधा वापरूनदेखील पाठविता येईल. इच्छुक वर्गणीदारांनी बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे येथील मराठी अभ्यास परिषदेच्या बचत खाते क्र० 20057164260 ह्या खात्यावर वर्गणीची रक्कम जमा करावी व व्यवहार पूर्ण केल्यानंतर परिषदेकडे पत्राद्वारे वा ई-टपालाने व्यवस्थापकांच्या पत्त्यावर शक्य तितक्या लवकर वर्गणीदाराचे संपूर्ण नाव, टपाल-पत्ता, स्थिरभाष क्रमांक, चलभाष क्रमांक, वर्गणी कोणत्या अंकापासून घेतली जावी त्याबाबत व भरणा केलेल्या रकमेचे तपशील कळवावेत.

# सतराव्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त

मराठी अभ्यास परिषदेची २०१२-१३ या आर्थिक वर्षासाठी सतरावी वार्षिक सर्वसाधारण सभा, रविवार, दि० २८ जुलै २०१३ला प्रा० प्र०ना० परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली वर्ग क्र० ए-२, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे येथे पार पडली. सकाळी नऊ वाजता सुरू होणारी ही सभा पुरेशा गणसंख्येअभावी सकाळी नऊऐवजी सव्वानऊ वाजता सुरू झाली. या सभेला १७ सभासद उपस्थित होते.

विषयपत्रिकेनुसार सर्वप्रथम गेल्या आर्थिक वर्षात आणि या वार्षिक सभेपूर्वी दिवंगत झालेल्या मान्यवरांना श्रद्धांजली वाहण्यात आली. यामध्ये कविवर्य ग्रेस, प्रा० डॉ० चंद्रशेखर जहागीरदार, प्रा० रवीन्द्र किंबहुने, प्रा० शंकर सखाराम, डॉ०रंजना फडके, डॉ० मु०श्री० कानडे, डॉ० र०बा० मंचरकर यांच्या निधनाबद्दल शोक व्यक्त करण्यात आला.

त्यानंतर कार्यवाह प्रा० आनन्द काटीकर यांनी मागील वर्षाच्या (२०११-१२) वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त वाचून दाखवले आणि ते कायम करण्याची अनुमती मागितली. नीलिमा गुंडी यांच्या सूचनेने आणि विजय पाध्ये यांच्या अनुमोदनाने हे इतिवृत्त सर्वानुमते कायम करण्यात आले.

प्रा० आनन्द काटीकर यांनी २०१२-१३ या आर्थिक वर्षाचे कार्यवृत्त वाचून दाखवले. हे कार्यवृत्त संमत करण्यासाठी डॉ० अशोक जोशी यांनी सूचक म्हणून आणि सुमन बेलवलकर यांनी अनुमोदक म्हणून काम केले. सर्वानुमते ते मान्य झाले.

लेखापरीक्षकाने तपासलेले २०१२-१३ या आर्थिक वर्षाचे जमाखर्चपत्रक आणि ताळेबंद संमत करण्याचा ठराव, २०१३-१४ या आर्थिक वर्षाचा अर्थसंकल्प संमत करण्याचा ठराव आणि २०१३-१४ या आर्थिक वर्षाकरता लेखापरीक्षकाची व कायदेविषयक सल्लागाराची नेमणूक करणे आणि त्यांचे मानधन ठरवणे असे तीन ठराव कोशाध्यक्ष विजया चौधरी यांनी मांडले. मृणालिनी शहा यांच्या सूचनेने आणि कालिदास मराठे यांच्या अनुमोदनाने हे तीनही ठराव एकमताने संमत करण्यात आले.

माननीय अध्यक्षांच्या परवानगीने आयत्या वेळचे विषय मांडण्यासाठी कोणीही पुढे आले नाही. त्यामुळे ही सभा संपली असे अध्यक्षांच्या अनुमतीने जाहीर करण्यात आले.

**चर्चा :**

सभेला जोडूनच 'मराठीतील कोणत्या साहित्यिकाला आगामी ज्ञानपीठ पुरस्कार मिळू शकतो?' या विषयावर खुली चर्चा आयोजित केली होती. या चर्चेत श्री० विजय पाध्ये, प्रा० प्र० ना० परांजपे, डॉ० सुमन बेलवलकर, श्री० शंकर सारडा आणि डॉ० अशोक जोशी यांनी आपापली अभ्यासपूर्ण मते मांडली. यामध्ये विजय पाध्ये यांनी ज्ञानपीठ पुरस्काराची पार्श्वभूमी सांगितली. पुरस्कार कोणाकडून दिला जातो, त्याच्या निवडीचे निकष काय असतात ही माहिती पाध्ये यांच्या प्रास्ताविकातून सर्व उपस्थितांना मिळाली. त्यानंतर प्रा० प्र०ना० परांजपे यांनी 'हिंदुस्थान टाइम्स' समूहाचा 'सरस्वती पुरस्कार' आणि 'टाइम्स ऑफ इंडिया' समूहाचा 'ज्ञानपीठ पुरस्कार' असल्याचे स्पष्ट केले. म्हणजे दोन्ही पुरस्कार विशिष्ट वृत्तपत्र समूहाचे असूनही केवळ ज्ञानपीठ पुरस्कारालाच एवढे महत्त्व का, असा रास्त प्रश्नदेखील त्यांनी उपस्थित केला. अशा परिस्थितीत आपण केवळ ज्ञानपीठ पारितोषिकाचीच चर्चा करतो आहोत, असा विरोधाभासही त्यांनी दाखवून दिला.

डॉ० सुमन बेलवलकर यांनी भालचंद्र नेमाडे यांचे नाव यासाठी योग्य आहे, असे ठामपणे सांगितले. आपल्या विवेचनात त्यांनी नेमाडे यांच्या समग्र साहित्याचा धावता आढावा घेतला. प्रा० शंकर सारडा यांनी मराठी माणसे भारतीय पार्श्वभूमीवर आपल्या साहित्याचे विपणन करण्यात कमी पडतात, असे दाखवून दिले. आपले शासनही याविषयात कर्नाटक अथवा तामिळनाडू सारखे प्रयत्न करत नाही, असेही त्यांनी सोदाहरण सांगितले. दरवर्षी सर्व मराठी समाजाने मिळून चार ते पाच नावांची शिफारस करायला हवी. त्यांच्या साहित्याची अन्य भाषांमध्ये समीक्षा प्रसिद्ध करायला हवी, असेही त्यांनी सुचविले. डॉ० अशोक जोशी यांनीही सारडा यांच्या मताला दुजोरा दिला. सर्व मराठी माणसांनी आपले हेवेदावे, गटतट दूर ठेवून उत्तम साहित्यिकांच्या पाठीशी उभे राहायला हवे, असे जोशी यांनी सांगितले. आपल्या साहित्याविषयी मुख्यत्वे हिंदी आणि इंग्रजी भाषेत लेखन करावे आणि आपले लेखक सर्वांना परिचित करून द्यावे, अशीही अपेक्षा त्यांनी व्यक्त केली.

एकंदरीत या चर्चेतून; साहित्याच्या पुरस्कार निवडीतही विपणन, समीक्षा यांचे मोठे योगदान असू शकते, याचे भान उपस्थितांना आले.

■

## १ 'फशाळ'

श्रीमती विजया मेहता यांचे 'झिम्मा' हे आत्मचरित्र वाचले. त्यात पृ० ३०५ वर 'फशाळ तांत्रिक बाजू' असा शब्दप्रयोग आहे. तो कळला नाही. माझ्याकडील शब्दकोशातही तो शब्द ('फशाळ') आढळला नाही. बरं, तो मुद्रणदोष आहे, असेही वाटेना. म्हणून मी 'राजहंस प्रकाशन'चे श्री० दिलीप माजगावकर यांना दूरध्वनी केला.

काही दिवसांनी त्यांचे पत्र आले. त्यांनी लिहिले होते, ''या ठिकाणी ढिसाळ, कच्च्या, नीट काळजी न घेतलेल्या, नीट लक्ष न पुरवलेल्या अशा अर्थी वापरलेला 'फशाळ' हा शब्द श्रीमती विजया मेंहता यांच्या आजी आणि आईच्या बोलण्यात येत असल्याचा उल्लेख त्यांनी केला होता. तो शब्द त्या परिसरातील प्रचलित शब्द बहुधा नसावा. काही वेळा एखादे कुटुंब वा काही मोजक्याच व्यक्ती यांच्यापुरतीच एखाद्या खास शब्दाची व्याप्ती असते, तसे या शब्दाचे रूप असू शकेल.'' ■

प्र०ना० परांजपे, सी-1, सुरजबन सहनिवास, गणेशखिंड मार्ग, पुणे 411007.
चलभाष 094225 09638

## २ 'पावसाळा २०१३'विषयी

सप्रेम नमस्कार,

'भाषा आणि जीवन'चा (वर्ष ३१/अंक ३/पावसाळा२०१३) अंक मिळाला. संपूर्ण वाचला. आवडला.

१. आपण सुरू केलेली ई-शब्दचर्चा आवडते. त्याचे कारण, काही अभ्यासक मजेशीर लेखन करतात. उदा० लघुभोजन हा पर्याय योग्य वाटत नाही. 'महाभोजन' हे तेराव्याचे जेवण मानले जाते. त्यानुसार संस्कारांच्या दृष्टीने लघुभोजन हे बारशाचे मानावे लागेल.

२. वऱ्हाडी बोलीत 'पखाल' हा शब्द प्रचलित आहे. बाबाराव मुसळे यांची 'पखाल' नावाची कादंबरी प्रकाशित आहे. ह्या कादंबरीत व वऱ्हाडीत 'पखाल' हा शब्द 'पाणी वाहून नेण्याची चामड्याची पिशवी', ह्या अर्थी प्रचलित आहे. आमच्या वऱ्हाडाला पखाल बैलाच्या पाठीवर ठेवून पाणी आणत नाहीत तर ती म्हैस किंवा हेल्याच्या पाठीवर ठेवून आणतात. म्हणून, 'पखालीचा हेला, पानी वायतावायता मेला' अशी एक म्हणही

रूढ आहे. पखाल हा शब्द लीळाचरित्रात व श्रीगोविंदप्रभू चरित्रात आढळतो- 'तळाश्रीलरीचे उदके एका वाटली: पाखालाची उदके एका वाटली:'- (ली०३४४.) 'मग खुंटीची पाखाल काढीली: येकी आंखेयावरि नीजवीले: एक आंखे पांगुरवीले.' - (गोवि०७.) पखालीने घरोघरी पाणी आणणारा 'कोळी' हा विशिष्ट समाज आहे. त्याला गावातून बलुते मिळते. बलुते म्हणजे त्याच्या कामाच्या बदल्यात मिळणारे धान्य. तसेच दररोज पखाल टाकल्यानंतर तेथे पोळी, भाकर, भाजी इ० मिळत होती. 'मेड इन इंडिया' ह्या कादंबरीत 'पखालपार्वती' हा शब्द आढळला- 'तुमी निरा पखालपार्वतीवानी येका जागी बसल्या तं वावराची माती चयेते हाती.'

■

रावसाहेब काळे, मु०पो० लोणी, पो० रिधोरा, ता० बाळापूर, जि० अकोला 443002.

## ३ राईलकरांच्या अनुवादाबाबत

'भाषा आणि जीवन' - उन्हाळा २०१३च्या अंकात 'माझा मुलगा शाळेत संस्कृत शिकतो का?' हा मूळ इंग्रजी लेखाचा श्री० मनोहर राईलकर यांनी केलेला अनुवाद आला आहे. त्यात पृ० २१वर ''चॉसरचे 'पिलग्रिम्स् प्रोग्रेस' इ०स० ७००च्या आसपास रचले गेले.'' असे एक विधान आहे. चॉसरचा काळ इ०स० १३४३-१४०० हा असून 'पिलग्रिम्स् प्रोग्रेस' हा ग्रंथ चॉसरचा नव्हे. या ग्रंथाचा कर्ता जॉन बन्यन् (John Bunyan) हा आहे. इ०स० १६२८-१६८८).

नॉर्मन कॉंकेस्ट (इ०स० १०६६)नंतर त्या काळी प्रचलित असलेल्या प्राचीन इंग्रजी (Old English) किंवा अँग्लो सॅक्सन भाषेवर फ्रेंच शब्दांचा - विशेषत: राजकीय, व्यापारी व पर्यायाने सामाजिक क्षेत्रांत - फार मोठ्या प्रमाणावर पगडा बसला आणि अशा प्रकारे अकराव्या शतकापासून ते सुमारे पंधराव्या शतकापर्यंत प्रचलित असलेली ही भाषा मध्ययुगीन इंग्रजी (Middle English) या नावाने ओळखली जाऊ लागली. चॉसरने आपले लेखन मुख्यत्वे याच भाषेत केले. त्याची गाजलेली साहित्यकृती (कॅण्टरबरी टेल्स) (अपूर्ण) ही आहे.

■

वि०दा० सामंत, 16, यशोदाकुंज सोसायटी, तेजसनगर, कोथरूड, पुणे 411038.
स्थिरभाष (020) 2538 3755

## लेखक-परिचय

- **काळे,** रावसाहेब **:** एम०ए०,पीएच०डी०. 'समकालीन ग्रामीण साहित्य', डॉ०वि[illegible]
वाघ गौरवग्रंथाचे संपादन. वऱ्हाडी बोली संशोधन केंद्र (लोणी)चे अध्यक्ष.
टपाल-पत्ता : मु० लोणी, पो० रिधोरा, ता० बाळापूर, जि० अकोला 411 30[illegible]
भ्रमणभाष : 099231 93262 ई-पत्ता : raosaheb_kale@Rediffmail.c[illegible]

- **कुलकर्णी,** कल्पना **:** एम०ए०(इंग्लिश), एम०फिल,पीएच०डी० (स्टायलिस्टिक्स
महाविद्यालयीन व विद्यापीठ स्तरावर अध्यापन, सध्या निवृत्त. पुणे विद्यापीठा
इंग्लिश विभाग व ब्रिटिश कौन्सिल यांच्या एका संयुक्त प्रकल्पात सहभाग.
टपाल-पत्ता : ए-11, सूर्यप्रकाश अपार्टमेंट्स मार्केटयार्ड रस्ता, पुणे 411 037.
चलभाष : 098904 66067

- **धारूरकर,** चिन्मय **:** एम०एम०फिल, (भाषाशास्त्र), आय०आय०टी०(मुंबई) ये[illegible]
पीएच०डी०चा अभ्यास सुरू. नागपूर विद्यापीठाच्या भाषाशास्त्र व परकीय आ[illegible]
इतर भारतीय भाषाविभागात साहाय्यक प्राध्यापक. संस्कृत, उर्दू, बांगला, गुजरात
कोकणी, तेलुगू, पर्शियन आदी भाषा अवगत. अनेक राष्ट्रीय व आंतरराष्ट्[illegible]
चर्चासत्रांमधून निबंध सादर. नियतकालिकांमधून लेखन. साहित्य, समीक्षा, तत्त्वज्ञा
भाषाविज्ञान या विषयांतील अनुवाद प्रसिद्ध.
टपाल-पत्ता : अर्णव C-1, फेज 1 दिशा, नभांगण, सिडको, औरंगाबाद 431 0[illegible]
स्थिरभाष : (0240) 2474 881, चलभाष : 093716 77728
ई पत्ता : chinmayvijay@gmail.com

- **भाटे,** सरोजा **:** माजी विभागप्रमुख, संस्कृत-प्राकृत भाषाविभाग, पुणे विद्यापी[illegible]
माजी मानद सचिव, भांडारकर प्राच्यविद्या संशोधन मंदिर, पुणे. अध्यक्ष, प्र[illegible]
पाठशाळा मंडळ, वाई. 'सुभाषित रत्नभाण्डागार' या पुस्तकाचा मराठीत अनुवा[illegible]
टपाल-पत्ता : 'क्रतु', निर्मलबाग, 15/46, पर्वती पेठ, पुणे 411 009.
स्थिरभाष : (020) 2422 6854

- **भावे,** श्री०मा० **:** एम०ए०, एम०फिल,पीएच०डी० (गणित), पुणे विद्यापीठाच[illegible]
अधिसभेचे दहा वर्षे सभासद, भारत इतिहास संशोधन मंडळाचे गेली २१ वर्षे चिटणी[illegible]
'नवभारत' मासिकाचे संपादक. 'जीर्णोद्धार', 'सरखोत कोलंबस', 'मानवतेचा उपास[illegible]
थॉमस पेन' आदी पुस्तके प्रकाशित.
टपाल-पत्ता : 33/20, चौथी गल्ली, प्रभात रस्ता, पुणे 411 004.
स्थिरभाष : (020) 2567 4093

■ **मोहिते,** शरदिनी : एम०ए० (मराठी व संस्कृत) अनेक नियतकालिकांतून लेखन. समाजशिक्षणमालेमध्ये काही पुस्तके प्रकाशित. 'थर्ड वेव्ह', 'देवदास' व 'परिणीता' या पुस्तकांची भाषांतरे प्रकाशित.
टपाल-पत्ता : ए 1/4, शरयू, सरितानगरी, फेज 2, सिंहगड रस्ता, पुणे 411 030.
स्थिरभाष : (020) 2425 1353 चलभाष : 099216 08242

■ **क्षीरसागर,** हेमा : एम०ए० (संस्कृत), एम०एड०, पीएच०डी०. टिळक शिक्षण महाविद्यालय (पुणे) येथून प्रभारी प्राचार्य म्हणून निवृत्त. 'जीवनमृत्यूच्या सीमेवरून', 'बाराव्या शतकातील खाद्यसंस्कृती', 'बिंब-प्रतिबिंब' इत्यादी पुस्तकांचे लेखन. प्रबंधासाठी व लेखनासाठी काही पुरस्कार प्राप्त.
टपाल-पत्ता : 1294, शुक्रवार पेठ, सातवा रस्ता, सुभाषनगर, पुणे 411 002.
चलभाष : 094220 80865

---

**चित्रकार परिचय :**

■ **वाघ,** सलील : कवी व चित्रकार, बंगळुरू व मुंबई येथील काही जाहिरात कंपन्यांमध्ये स्टुडिओ मॅनेजर म्हणून व 'स्प्रिंगर' ह्या आंतरराष्ट्रीय प्रकाशनगृहात विभागप्रमुख म्हणून नोकरी केल्यानंतर आता संगणकीय मुद्रायोजन व तांत्रिक सेवा देण्याचा स्वतंत्र व्यवसाय. 'रेसकोर्स आणि इतर कविता'सह एकूण सात कवितासंग्रह प्रकाशित. शमशेर बहादूर सिंह ह्यांच्या हिंदी कवितांचा मराठीत परिचय करून देणारे पुस्तक प्रकाशित. सुरुवातीपासून कवितेत आणि चित्रांत गेल्या काही वर्षांपासून प्रयोग. चित्रांचे एकच जाहीर प्रदर्शन. समकालीन आंतरराष्ट्रीय चित्रकारांच्या समुदायाकडून त्याचा अगत्याने स्वीकार.
टपाल-पत्ता : 81, कसबा पेठ, पुणे 411 011.
चलभाष : 094225 11238 ई पत्ता : saleelwagh@gmail.com

## लेखकांसाठी सूचना

'भाषा आणि जीवन'मध्ये प्रकाशित करण्यासाठी लेखन पाठवताना त्यासोबत इतर कोणत्याही ठिकाणी (नियतकालिक, जर्नल्स, स्मरणिका वगैरे) सदर लेखन प्रकाशित झालेले नाही, असे लेखकाने स्पष्ट निवेदन करणे आवश्यक आहे. लेखनाचे टंकन संगणकाचा उपयोग करून केलेले असल्यास उत्तम, कोणतेही सॉफ्टवेअर वापरून टंकन केलेले असो, लेखन ई-टपालाद्वारे पाठवताना त्यासोबत टंकनकामात ज्या टंकांचा वापर केलेला असेल ते टंक व संपूर्ण लेखनाची एक पीडीएफ स्वरूपात तयार केलेली प्रत पाठवावी. 'भाषा आणि जीवन'मध्ये प्रसिद्ध करण्यासाठी लेखन पाठविल्यानंतर संपादकांची अनुमती घेतल्याखेरीज ते इतरत्र प्रकाशित करण्यासाठी देऊ नये.

